



शकार

# डॉ. केतकर

लेखक - डॉ. द. न. गोखले

# अनुक्रमणिका

## प्रास्ताविक



## चरित्र



## परिशिष्टें

## डॉ. श्री. व्यं. केतकर



न्म २-२-१८८४ मृत्यू १०-४-१९३७

# अंजलि

महाराष्ट्रात आपल्या लेखनाने, व्यक्तित्वाने व प्रत्यक्ष कार्याने ज्या महान् विभूति होऊन गेल्या त्यामधे कै. डॉ. श्री. व्यं. केतकर याची प्रमुखस्थानी गणना होईल. या सर्व थोर व्यक्तींच्या थोरपणाची जाणीव अजूनहि अखिल महाराष्ट्राला झालेली नाही. कै. इतिहासाचार्य राजवाडे याचें थोरपण यच्चयावत् लोकापर्यंत अजून कोठे पोचलें आहे ? कै. वासुदेव वामनशास्त्री खरे याची माहिती अजून आबालवृद्धाना कुठे झाली आहे ? मग जी स्थिति याची तीच डॉ. केतकराची झाली असल्यास नवल नाही. परंतु अशा लोकाच्या जीवन-कालानहि त्याचे थोरपण ओळखणाऱ्या म. म. दत्तोपंत पोतदार, श्री. गणपतराव जामेकर, डॉ. माधवराव पटवर्धन, प्रा. श्री. के. क्षीरसागर, श्री. यशवंतराव दाते वा श्री. चिंतोपंत कर्वे यासारख्या काही अधिकारी व्यक्ति होत्या व त्यानी प्रसंगोपात्त त्याच्या कार्याचा गौरवहि केला याबद्दल समाधान वाटतें. पुण्याच्या ' शारदोपासक संमेलनाची ' बैठक भरावयाची होती व महाराष्ट्र शारदा मंदि-राच्या कार्यकर्त्यांपैकी मी एक होतो. त्या वेळी प्रा. दत्तोपंत पोतदार आमचे मार्गदर्शक होते. त्यानी डॉ. केतकराना यंदा अध्यक्षपद द्यावयाचें अशी अनौ-पचारिक सूचना आम्हा सर्वांना दिली. त्या वेळी ' त्यानाच अध्यक्ष का करा-वयाचे ' अशी एक शंका मी विचारली. कारण त्या वेळी आम्हा तरुणाची वाङ्मयक्षेत्रातली आकर्षणें निराळी होती. डॉ. केतकर हे तसे काही तरुणाच्या मनाला वेधणारे लेखक नव्हते. परंतु माझ्या प्रश्नाला प्रा. पोतदार यानी जे शात व सविस्तर उत्तर दिले व त्यात डॉक्टरसाहेबाची थोरवी श्रेष्ठ दर्जाची कशी आहे याचें जें रसाळ विवेचन केलें त्याची छाप माझ्या मनावर अजूनहि कायम आहे. त्यानंतर त्याचे ग्रंथ मी वाचले व त्यातील काही महाविद्यालयीन विद्यार्थ्यांस शिकविले. आणि मग जेव्हा जेव्हा डॉक्टरसाहेबाची गाठ पडली तेव्हा तेव्हा त्याच्याशी बोलणें, त्याचे विचार ऐकणें, त्याचे मनःपूर्वक आदरा-तिथ्य करणें यांत मला अंतःसमाधान झालें.

परंतु या महान् व्यक्तीची आपल्या समाजात ससेहोलपट झाली हें मनात आलें की अजूनहि वाईट वाटतें ! एकदा पुण्यात नानावाड्यासमोर त्याच्यामागे एक वात्रट मुलाचा घोळका लागलेला मी पाहिला. एखाद्या वेड्याच्यामागे मुलें लागून आरडाओरड करतात त्याप्रमाणे ती डॉक्टरसाहेबाच्यामागे लागलेली पाहून मला वाईट वाटलें. त्या मुलाचा प्रतिकार करण्यासाठी मी पुढे होणार, तोंच डॉक्टर शेजारच्या जोगळेकराच्या विश्रांतिगृहात गेले व पुढील धोंडफेकीचा अनिष्ट प्रसंग टळला. लहान–मोठ्या वा ज्ञानी–अज्ञानी समाजात असा त्याचा छळ वा त्याची उपेक्षा झालेली अनेक उदाहरणें आहेत. पण त्याचें व्यक्तिमत्त्व थोर, त्याची महत्त्वाकांक्षा जबरदस्त, त्याच्या कार्याचा झपाटा विलक्षण, त्याचे विचार सोसाट्याच्या वादळी वाऱ्यासारखे व त्याची कार्यैकनिष्ठा फार अढळ त्यामुळेच त्यानी प्रचंड कार्य केले. त्याची अनेक दर्शनें सूक्ष्मपणें पाहणारास फार आकर्षक वाटणारी होती. ज्ञानकोश कचेरीतील केतकर, प्रचारासाठी हातात बॅग घेऊन फिरणारे केतकर, रस्त्याने खिशातील खाद्य खात खात विचाराच्या तंद्रीत चालणारे केतकर, ‘ स्वराज्य मिळालेंच आहे फक्त स्टेट सेक्रेटरीवर हुकूमनामा बजावून त्याचा ताबा घेतला पाहिजे ’ असें साधार विवेचन करणारे प्रवासातील मित्र केतकर, एखाद्या गाढ्या पंडिताप्रमाणे वाचनात दंग झालेले केतकर, स्वतःच्या मुलाबरोबर सतरंजीवर लोळण घेऊन करमणूक करणारे केतकर, वा शीलावतीबाईनी केलेला चहा घेताना ‘ असा चहा बाहेर कुठेहि मिळत नाही ! ’ म्हणून ‘ धन्यो गृहस्थाश्रमः ’ वृत्तीचे केतकर अशी त्याची कितीतरी दर्शनें अजून मनाचा वेध घेतात; व त्याच्या व्यक्तिमत्त्वाचे निरनिराळे पैलू दाखवून त्याची थोरवी पटवितात.

डॉक्टरसाहेब विक्षिप्त होते, पण त्याचा विक्षिप्तपणा राष्ट्रातील एखाद्या महापुरुषाला शोभणारा होता. त्यात त्याची अचाट कल्पनाशक्ति, मराठी भाषेसंबंधीची तीव्र पोटतिडिक व पूर्वापार संस्कृतीसंबंधीची उत्कट आपुलकी दिसून येत होती. म्हणूनच त्यानी लग्न करताना ‘ व्रात्यस्तोम ’ विधि केला; म्हणूनच त्यानी हैद्राबाद संमेलनाचें निजामद्रोही भाषण संपूर्ण छापून घेऊन फक्त निजामद्रोही मजकुरावर “ Cancelled ! ” Cancelled ! ” असा शिक्का मारून लोकांना ते वाचण्याची सोय होईल.

असें केलें व स्वतः कायद्याच्या कचाट्यातून सुटले; किंवा म्हणून त्यानी मुंबईच्या गव्हर्नराने मराठीत सही केल्यावाचून त्या कागदाला सरकारी हुकुमाचें स्वरूप येऊं नये असे म्हटलें. साराश राजकीय, सामाजिक, धार्मिक, आर्थिक वगैरे सर्वच बाबतीत ते क्रातिवादी होते व त्यानी आपलीं मते जनतेपुढे ठासून माडली.

डॉ. केतकराच्या जीवनातील कितीतरी रहस्यें व त्याच्या कार्यातील कितीतरी थोर गोष्टी अजून आपणास समजावयाच्या आहेत. त्या समजल्या तरी पचनी पडल्या पाहिजेत. त्या पचनी पडल्या म्हणजे आपल्या समाजाचे पाऊल निश्चित पुढे पडलें आहे, असे आपल्या अनुभवास येईल. पण त्यासाठी त्याच्या लिखाणाचे व विचारप्रणालीचें संशोधन होऊन जनतेपुढे ते सर्व सुंदर भाषेत माडलें गेलें पाहिजे. या कार्याला माझे विद्यार्थिमित्र श्री. द. न. गोखले यानी हात घातला आहे, हे पाहून मला पराकाष्ठेचें समाधान वाटते. श्री. गोखले यानी कै. बाबाराव सावरकर चरित्राची जुळवाजुळव व माडणी कशी केली याचा इतिहास ज्याना माहीत असेल, त्याना डॉ. केतकराच्यासंबंधीचें काम त्यानी हाती घेतलें, याचें समाधान वाटेल. प्रस्तुतचे छोटेखानी चरित्र म्हणजे विद्यार्थ्यांसाठी तर आहेच, पण ती भावी ग्रंथाचीहि वानगी आहे. श्री. गोखले याचेजवळ प्रतिभा व प्रज्ञा ही दोन्हीहि आहेत; आणि याच्या जोडीला त्याच्याजवळ उमाप हौस व उत्साह ही आहेत. बालमनाचें त्यानी सूक्ष्म निरीक्षण केलें आहे व चरित्रलेखनात रंगत कशी आणावी, ही कला त्याना उत्तम अवगत आहे. थोडक्यात म्हणजे ते एक व्यासंगी व प्रतिभाशाली कलावत लेखक आहेत. तेव्हा हे चरित्र उत्कृष्ट उतरलें असल्यास नवल नाही. यातील कितीतरी प्रकरणें विद्यार्थ्यांना उद्बोधक व मनोरंजक वाटतील. त्याच्या या चरित्रातील कितीतरी परिच्छेद व कितीतरी वाक्ये विद्यार्थ्यांना जिव्हाग्री सतत खेळवावीत असे वाटेल. तेराव्या पानावरील मराठीच्या प्रेमासंबंधीचें वाक्य, पंधराव्या पानावरील ओगराळ्याची कल्पना, एकोणिसाव्या पानावरील ‘ परीक्षामोजू ’ ही शिवी, बाविसाव्या पानावरील केतकराच्या श्रमशीलतेचें वर्णन, सव्विसाव्या पानावरील ऋषि कोण याची व्याख्या, अठ्ठाविसाव्या पानावरील व्यासाच्या परंपरेचा उल्लेख, तिसाव्या पानावर दिसणारी ‘ काचनगंगा, धवलगिरी, गौरिशंकर ’ हीं शिखरें, पंचेचाळिसाव्या पानावरील वाङ्मयाच्या उंचीचें रेखाटलेले रहस्य, अठ्ठेचाळि-

साव्या पानावरील ‘ द्रष्टया गुरू ’ची दिलेली पदवी, अठ्ठावन्नाव्या पानावरील ‘ पट्टाभी ’ च्या अनुयायित्वाचा निर्देश, ऱ्याऐंशी पानावरील ‘ अंकुरलेल्या कामा ’ची व ‘ कल्पनाबीजा ’ची उपमा, व प्रत्येक प्रकरणाच्या शेवटी दिलेले प्रश्न विद्यार्थ्यांना पदोपदी रोखून धरतील व श्री. गोखले यांच्या रसाळपणाची साक्ष पटवितील. श्री. गोखले यांचें लिहिणें त्यांच्या वक्तृत्वासारखेंच प्रेरक असतें व हेंच शिक्षकाचें काय किंवा चरित्रलेखकाचें काय खरें काम असतें. त्या कामी त्यांना संपूर्ण यश लाभले आहे व हें चरित्र वाचून विद्यार्थिवर्गावर निश्चित काही प्रेरक संस्कार होतील असें मला वाटतें. शाळाचालकांनी व पालकांनी मुलांच्या हाती हे चरित्र जरूर द्यावे.

डॉक्टरांचें स्मरण त्यांच्या पूर्वीच्या ‘ आशास्थान ’ च्या बाजूला हिंडावयास गेलें की अजूनहि होतें. वाटतें की डॉक्टरसाहेब समोरून येत आहेत, हातात कातडी बॅग आहे, मळका जुना तांबूसर ‘ टाय ’ शर्टवर कसातरी लोंबतो आहे, कोटाचें बटण सुटलें आहे, चौकस डोळे तरलपणे इकडे तिकडे पाहात आहेत व खालचा ओठ एका विशिष्ट लकबीनें हलत असून मला ते म्हणताहेत —“ थांबा हं ! तुमचें नाव ( यशवंत की गिरीश ) सांगू नका, मी नक्की ओळखतों ! तुम्ही-तुम्ही-तुम्ही यशवंत ? ” आणि मग मी “ चुकलें डॉक्टर-साहेब ! मी गिरीश ” असें म्हटल्यावर ते एकदम खो खो हसताहेत व “ पुन्हा नक्की लक्षात ठेवीन अं ! ” असें हस्तांदोलन करीत म्हणताहेतसें वाटतें. यासारखीं मनोहर स्मृतिचित्रे विद्यार्थ्यांना या चरित्रात उपलब्ध करून दिल्या-बद्दल श्री. गोखले हे धन्यवादास पात्र आहेत.

पुणें शहर<br>
२ मार्च, १९५०

प्रा. शं. के. कानेटकर, एम्. ए.<br>
*( गिरीश )*

# अभिप्राय

गेल्या अर्ध्या शतकात महाराष्ट्रात विद्वान् आणि कर्तृत्वसंपन्न अशी जीं काही थोडी माणसें होऊन गेली, त्यामध्ये डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर याची निःसंशय गणना होते. विद्वत्ता आणि कर्तृत्व या दोनहि गोष्टी एकत्र आढळणें ही घटना साधारणपणे क्वचितच होते. अशा माणसाना खरोखर ' पुरुषोत्तम ' किंवा ' महापुरुष ' हे नाव शोभून दिसतें. त्याची चरित्रे, ज्याच्या जीवनातील कर्तृत्व यापुढील अर्ध्या शतकात व्हावयाचे आहे, अशा संस्कारक्षम विद्यार्थि-वाचकापुढे ठेवणे हे शैक्षणिक आणि सामाजिक अशा दोनहि दृष्टींनी आवश्यक ठरतें. श्री. द. न. गोखले यानी हे आवश्यक असें कर्तव्य फार चागल्या प्रकारें पार पाडले आहे, असें कोणाहि वाचकाचे मत होईल, अशी मला खात्री वाटते.

डॉ. केतकराचें चरित्र जेवढे उद्बोधक आहे, तेवढेच ते मनोरंजक आहे; आणि त्याचें चरित्र जेवढे मनोरंजक आहे, तेवढेंच त्याचें व्यक्तिमत्त्व कुतूहल-जनक आहे. त्यामुळे थोर लोकाच्या इतर चरित्राप्रमाणे ते गंभीर आणि कंटा-ळवाणें होण्याचा संभव नाही. परंतु ह्यामुळेच त्याच्या चरित्राचें आकलन हें सहज करता येणार नाही. त्याचा माबडा स्वभाव व त्याचा विक्षिप्तपणा, त्याची थोर विद्वत्ता आणि त्याच्या वर्तनात अनेक वेळा प्रकट होणारी बालिशता, त्याचा हिंदुधर्माबद्दलचा आणि ब्राह्मण्याचा अभिमान आणि त्यानी एका युरो-पीय महिलेबरोबर केलेला विवाह या साऱ्याची संगति लावणे वरवर पाहाणाऱ्याल-शक्य होत नाही. श्री. गोखले यानी हे काम फारच सहृदयतेने आणि कौशा ल्याने केले आहे. आपल्या पीएच्. डी. च्या प्रबंधासाठी त्यानी केतकरांच्या वाङ्मयाचा, चरित्राचा व व्यक्तिमत्त्वाचा फार परिश्रमपूर्वक व खोल असा अभ्यास केला आहे. त्यामुळेच त्याना हे शक्य झालें आहे. त्याच वेळी आपण प्रस्तुत चरित्र कोणाकरिता लिहीत आहों व त्याना काय सागावें याचीहि त्याना

चांगली जाणीव आहे. म्हणून तपशिलावर भर न देतां, पण आवश्यक त्या सर्व गोष्टी त्यांनी बिनचूकपणें मुलांच्यापुढे ठेवल्या आहेत. केतकरांचा स्वभाव, त्यांची अभ्यासपद्धति, त्यांचें कौटुंबिक जीवन, त्यांच्या निरनिराळ्या चळवळी, त्यांच्या लेखनाचे विशेष, त्यांचें वाङ्मयीन कार्य या सर्वांची योग्य अशी कल्पना श्री. गोखले यांनी लिहिलेल्या या लहान चरित्रावरून येत आहे. हें सारें सरस, सगुण आणि सालंकार अशा आकर्षक भाषेमध्ये त्यांनी लिहिलेलें आहे. ज्या विद्यार्थि—वाचकांकरिता तें लिहिलें आहे, त्यांना तें आवडल्या-खेरीज राहाणार नाही. केतकरांच्याविषयी त्यांचा जो प्रबंध प्रसिद्ध व्हावयाचा आहे, त्याची ही वानगी ज्यांना प्रथम मिळत आहे, त्या मुलांचें खरोखर अभिनंदन करावयास पाहिजे.

म्युनिसिपल कॉलनी
पुणें ४.
३ मार्च, १९५०

प्रा. रा. श्री. जोग, एम्. ए.

# लेखकाचें निवेदन

या चरित्राचें पहिलें हस्तलिखित १९४८ च्या फेब्रुवारी-मार्चमध्ये रा. अमरेंद्र गाडगीळ यांच्या आग्रहावरून ' मंगल साहित्य प्रकाशना ' साठी मीं तयार केलें. तें ४ जून १९४८ ला मीं रा. गाडगीळांच्या स्वाधीन केलें; पण १५ मे १९४९ पर्यंत रा. गाडगीळ त्याचें प्रकाशन करूं शकले नाहीत. त्यानंतर रा. गाडगीळांकडून मीं हस्तलिखित परत घेतलें आणि ' जयभारत एजन्सी 'च्या विनंतीप्रमाणे तें प्रकाशनासाठी त्या एजन्सीकडे द्यावयाचें ठरविलें. मध्यन्तरीं केतकरविषयक माझा अभ्यास बराच वाढला होता; तेव्हा पहिलें हस्तलिखित अजिबात बाजूला टाकून डिसेंबर १९४९ च्या पहिल्या पंधरवड्यांत मीं आमूलाग्र नवें हस्तलिखित तयार केलें. या नव्या हस्तलिखिताचें प्रकाशन मार्च १९५० मध्ये ' जयभारत एजन्सी ' ने केलें आणि बराच काळ अप्रसिद्धीच्या अंधारात ठेचकळणाऱ्या या पुस्तकाला प्रकाश लाभला! ' जयभारत एजन्सी 'च्या चालकाचा याबद्दल मी ऋणी आहें.

पुस्तक प्रकाशित झाल्यावर अनेक मित्रानी व अधिकारी गृहस्थानी त्यावरील आपली मतें मला अगत्यपूर्वक कळविलीं; काही वृत्तपत्रांनी त्यावर अभिप्राय दिले; काही शिक्षकबंधूंनी विद्यार्थ्यांना पुस्तक शिकविताना कोणता अनुभव येतो तो मला निवेदन केला; आणि काही शाळाचालकानी पुरवणी-वाचनासाठी आपल्या शाळांतून पुस्तक नियुक्त केलें. या सर्वांचा मी मनःपूर्वक आभारी आहें. ज्या सूचना मला करण्यांत आल्या त्यांचा विवेकाने मीं स्वीकार केला आहे आणि ही द्वितीयावृत्ति सिद्ध केली आहे. प्रथमावृत्तीत मूलभूत स्वरूपाचे बदल, एक व्यक्ति वगळता, कोणीच सुचविले नव्हते. तेव्हा या आवृत्तीत मुद्रणदोषांची दुरुस्ती, नव्या घटनांचे उल्लेख व क्वचित् माहितींत राहिलेल्या उणीवांचें निराकरण एवढ्यापुरताच बदल करावा लागला.

या चरित्राला गुरुवर्य प्रा. गिरीशांनी आपुलकीने प्रस्तावना लिहिली आणि गुरुवर्य प्रा. जोगांनी त्यावर अभिप्राय दिला याबद्दल त्यांचे उपकार मानावे तेवढे थोडेच आहेत. एवढ्या छोट्या पुस्तकाला एवढे मोठे आशीर्वाद मिळावे, हें मी माझें भाग्य समजतों.

दुय्यम शाळातील ९ वीचे व १० वीचे विद्यार्थी डोळ्यांसमोर ठेवून या चरित्राची सर्व मांडणी केली आहे. विद्यार्थ्यांसमोर बाळबोध व डौलदार भाषेचा नमुना राहावा, वाङ्मयाच्या अभ्यासातील एक महत्त्वाचें अंग जें 'व्यक्तीचें आकलन' त्यात त्याचा प्रवेश व्हावा आणि महाराष्ट्राच्या बौद्धिक इतिहासांतील एका कर्त्या पुरुषाची भरपूर माहिती त्याना व्हावी, असे त्रिविध हेतु तींत सतत दृष्टीसमोर ठेवलेले आहेत. विद्यार्थ्यांच्या व्यक्तिविकासाला प्रेरणा द्यावी, हा हेतु सर्व शालेय वाङ्मयात व विशेषतः शालेय चरित्रवाङ्मयांत अपरिहार्यपणें असावा लागतो. तो हेतु या चरित्रामागे आहेच, हें वेगळे सांगावयास नको. या चरित्रात प्रत्येक प्रकरणाच्या शेवटी 'अभ्यास' जोडलेले आहेत. ते सखोल वाचनाची सवय वाढवण्यास उपयुक्त ठरतील, अशी आशा आहे. हें चरित्र म्हणजे 'पुरवणी-वाचन' होय, 'पाठ्य पुस्तक' नव्हे; म्हणून भाषिक प्रश्न किंवा बारीक तपशिलाचे प्रश्न 'अभ्यासा'त दिलेले नाहीत. चरित्राची रचना कालक्रमानुसार न करता विषयानुसार केली आहे, हे सुज्ञाच्या ध्यानी येईलच. अशा रचनेचे हानिलाभ त्यानी पारखावे, ही विनंती.

पीएच्. डी. च्या प्रबंधासाठी व केतकराच्या मोठ्या चरित्रासाठी जी माहिती मीं गोळा केली तिचा अंश या छोट्या चरित्रामुळे प्रथम प्रकाशात आला. या चरित्रातील काही माहिती आधी निरनिराळ्या ठिकाणीं प्रसिद्ध झालेली होती तर काही या चरित्रानेच प्रथम प्रसिद्ध झाली. चरित्र विद्यार्थ्यांकरिता लिहिलें असल्याने आधार दिलेले नाहीत. पण हे निश्चित समजावें, की 'नामूलं लिख्यते किंचित्' हा नियम काटेकोरपणें पाळण्याचा यत्न केलेला आहे.

म. सा. परिषदेच्या नियमास अनुसरून पुस्तकातील शुद्धलेखन ठेवलें आहे.

विद्यार्थ्यांनी, शिक्षकांनी व इतरांनी प्रथमावृत्तीचें जसें स्वागत केलें तसेंच याहि आवृत्तीचें स्वागत करावें, ही प्रार्थना.

२५३/७ सदाशिव पेठ,
लिमयेवाडी, पुणें २.
दि. १२।३।१९५४

द. न. गोखले

## १. व्यक्तित्व

१९१५ सालीं, आपल्या महाराष्ट्रामध्ये एका विशाल कल्पनेचा जन्म झाला. मराठी भाषेंत 'ज्ञानकोशा'ची रचना करावी, अशी ती कल्पना होती. ज्ञानकोशाची रचना म्हणजे काय ! तुम्हांला शब्दकोश ठाऊक आहे. शब्दकोशांत भाषेंतल्या सर्व शब्दांचा संग्रह केलेला असतो आणि त्यांचा अर्थ, व्युत्पत्ति वगैरे गोष्टी दिलेल्या असतात. ज्ञानकोशांत शब्दांचा संग्रह नसतो. तर ज्ञानाचा संग्रह असतो. जगांत जेवढे म्हणून विषय आहेत तेवढया सर्व विषयांची माहिती देण्याचा प्रयत्न ज्ञानकोशांत करतात ! म्हणजे शब्दकोशाच्या मानाने ज्ञानकोशाचें काम फारच प्रचंड असतें. शब्दकोश सह्याद्रीसारखा मानला तर ज्ञानकोशाला नगाधिराज हिमालयाचीच उपमा शोभून दिसेल. ज्ञानकोशांत जसा भूगोल असतो तसा इतिहासहि असतो, जसें गणित असतें तसें साहित्याहि असतें आणि पदार्थविज्ञानशास्त्रा-बरोबर त्यांत काव्यशास्त्रहि येतें. तुम्हांला ज्यांचीं नांवेंसुद्धा माहीत नाहीत अशीं अनेक शास्त्रें व अनेक विषय ज्ञानकोशामध्ये समाविष्ट

होतात. त्यात लंडनची माहिती सापडेल आणि 'तळेगाव ढमढेरें' या गावाचेंहि वर्णन आढळेल. त्यावरून शिवाजी महाराजांचें चरित्र समजेल आणि चीनमधल्या एखाद्या 'चांगटुंग'चा इतिहासहि कळेल. इंग्रजांच्याबद्दलचे ज्ञान त्यांत मिळेल आणि दरवेशी किंवा दरद या जातींची माहितीहि गवसूं शकेल. पायथॅगोरसचा सिद्धांत त्यामध्ये आहे आणि आर्किमिडीज्‌चें तत्त्वहि त्यांतून वगळलेलें नाही. कोणत्याहि विषयाची माहिती हवी असेल तर ज्ञानकोश उघडावा व त्या विषयाचें नांव काढावें, की सर्व माहिती हात जोडून दत्त म्हणून आपणांपुढे उभी राहाते. "अल्लाउद्दिन व जादूचा दिवा" या गोष्टींत अल्लाउद्दिनाने जादूचा दिवा घासतांच त्याच्यापुढे एक मोठा राक्षस येऊन उभा राहातो. तो राक्षस वाटेल तें काम चुटकीसरसे आटोपून टाकतो. ज्ञानकोश या राक्षसासारखाच असतो. त्याला वाटेल ती माहिती विचारा, ती तो लगेच तुमच्यापुढे आणून हजर करील! जगांतील सर्व महत्त्वाचें ज्ञान आपल्या पोटांत साठवणारा असला ज्ञानकोश मराठींत रचावा अशी ती कल्पना होती. केवढी धाडसी कल्पना ही! केवढें अफाट नि अवाढव्य काम करण्याची उमेद त्या कल्पनेमध्ये होती!

ही कल्पना ज्याने मांडली तो एक तरुण होता. त्याची तिशी नुकतीच उलटली होती. कल्पना पार पाडण्यासाठी हजारो रुपये लागणार होते. पण त्याच्यापाशी एक फुटकी कवडीदेखील नव्हती. तो बेकार होता आणि मनाजोगी नोकरी मिळण्याची त्याला आशा नव्हती. या कामाला अपरंपार विद्वत्तेची गरज होती आणि अशी विद्वत्ता आपणांपाशी आहे, असा आत्मविश्वासहि त्या तरुणास होता. पण इतरांना त्याच्या विद्वत्तेबद्दल जबर शंका होती. त्याने अमेरिकन

विद्यापीठांतून डॉक्टरेटची पदवी संपादन करून आणली होती, परंतु अमेरिकन पदवींत कांही दम नाही, असें येथल्या विद्यापीठांमधील विद्वानांना वाटत होतें. त्या वेळीं इंग्रजांच्या दास्यांत देश असल्यामुळे इंग्लंडमधील पदवी मोठी समजली जाई. इंग्लंडपेक्षा संशोधनाच्या शास्त्रांत अमेरिका पुढे गेली होती, पण त्याची दखल येथील विद्वानांनी तोंपर्यंत घेतली नव्हती ! ज्ञानकोशाच्या कामास वीस वर्षे लागतील, असा आपला अंदाज लो. टिळकांनी त्या तरुणाला सांगितला. इतिहासाचार्य राजवाडे तर म्हणाले, की हे काम आयुष्यभर पुरेल ! ज्ञानकोशाची रचना करावयाची म्हणजे अनेक विद्वानांना कामास जुंपावयाचें आणि त्यांच्या कामावर स्वतः देखरेख करावयाची. हें काम करण्यास पन्नाशी उलटलेला, प्रौढ, सर्वमान्य, परिणतप्रज्ञ विद्वानच हवा होता. पण हा तरुण अगदी नवखा, अल्पवयी, कोवळा होता. म्हणजे ज्ञानकोशाचें काम अंगावर घेतांना निरुत्साह करणाऱ्या अनेक गोष्टी त्या तरुणाला जणू आव्हानच देत होत्या. पण त्या तरुणाने हे काम पार पाडण्यासाठी कंबर कसली आणि सुमारें पंधरा वर्षे अविश्रांत श्रम करून तें यशस्वी केलें ! मराठी भाषेच्या इतिहासांत हा पराक्रम अभूतपूर्व होता.

असा पराक्रम ज्याने गाजविला त्याचें नांव श्रीधर व्यंकटेश केतकर ! 'डॉक्टर केतकर' या नांवाने महाराष्ट्रांतले सर्व सुशिक्षित लोक केतकरांना ओळखतात. केतकरांचें नांव घेतलें, की तेवीस खंडांचा त्यांचा प्रचंड ज्ञानकोश दृष्टीसमोर उभा राहातो. केतकरांनी ज्ञानकोश संपादिला पण ज्ञानकोशाच्या मलपृष्ठांत मावण्याइतके ते लहान मात्र नव्हते. त्यांनी इतर पुष्कळ वाङ्मय निर्माण केले आणि एकंदरींत विद्वत्तेच्या क्षेत्रांत आपली कीर्ति चिरंतन करून ठेवली. न्यायमूर्ति रानडे, डॉक्टर

भांडारकर, लोकमान्य टिळक, इतिहासाचार्य राजवाडे वगैरे पुरुष म्हणजे महाराष्ट्रांतले अग्रगण्य विद्वान् ! त्यांच्याच मालिकेंत केतकरांनी आपलें नांव गुंफून ठेवले. त्यांनी समाजशास्त्रावर इंग्रजीमध्ये जें पहिलेंच पुस्तक लिहिलें तें इतकें गाजलें, की युरोप खंडातल्या व अमेरिका खंडांतल्या अनेक विद्वानांनी त्याच्यावर टीका लिहून त्याचा गौरव केला. एका प्रसिद्ध विद्वानाने ,तर केतकरांच्या पुस्तकामुळे स्वतःचीं मतें बदलल्याचें प्रांजळपणें कबूल केलें. केतकराचा ज्ञानकोश जगांतल्या अनेक विद्यापीठांतून महाराष्ट्रीय विद्वत्तेचा साक्षीदार म्हणून जतन करून ठेवला जातो. महाराष्ट्राला केतकरांनी नवें ज्ञान दिलें आणि नवे विचार शिकवले. त्यांनी आपल्या विचारांनी महाराष्ट्राला जेवढे धक्के दिले तेवढे धक्के दुसऱ्या कोणत्याहि पुरुषाने पूर्वी कधीहि दिले नसतील. त्यांचे ग्रंथ, त्यांच्या कादंबऱ्या, त्यांचे लेख आणि त्यांचें सर्वच वाङ्मय म्हणजे ज्ञान आणि नवे विचार यांच्या खचून भरलेल्या खाणी आहेत. कोश, समाजशास्त्र, इतिहास, अर्थशास्त्र, राजकारण इत्यादि अनेक क्षेत्रांत त्यांनी लेखणी चालविली व सर्व क्षेत्रें आपल्या बुद्धीच्या प्रकाशाने उजळून टाकलीं.

असा हा विद्वान् पुरुष बोले कसा, चाले कसा, लिही-वाची कसा हें पाहाणें खरोखर मनोरंजक आहे. केतकर ‘ सर्व-भक्षक ’ वाचक होते; जें पुस्तक हातीं पडेल तें ते वाचीत; मग तो वेदांवरील एखादा रूक्ष ग्रंथ असो, की छानदार लुसलुशीत कादंबरी असो ! त्यांना कादंबऱ्या तर फार आवडत. कित्येक वेळा ते दुसऱ्याला कादंबरी वाचण्यास सांगत आणि मग त्याच्याकडून कथानक ऐकून घेत. एखाद्या पुस्तकाबद्दल अनेकांना प्रश्न विचारून त्यांच्या मतांवरून

ते त्या पुस्तकाबद्दल अनेकदा माहिती मिळवीत. दुसऱ्याने वाचावें आणि स्वतः खुर्चीवर ऐसपैस पडून ऐकावें, असाहि क्रम ते कधी कधी अवलंबीत. ते एवढे अभ्यासु विद्वान् खरे, पण पुस्तकांवर खुणा करणें किंवा त्यांचीं टिपणें काढणें त्यांना ठाऊक नव्हतें ! ते सावकाश थांबत थांबत वाचीत आणि वाचलेला मजकूर त्यांच्या मनावर वज्रलेप होऊन राही. संदर्भ लागला म्हणजे नेमक्या पुस्तकांतून ते तो हुड-कून काढूं शकत. त्यांच्या तीक्ष्ण स्मरणशक्तीबद्दल एक सांगण्या-सारखी आठवण आहे. त्यांच्या एका मित्राने सन १९०० मध्ये एक नाटक लिहिले होतें. या नाटकांतील पदें तो मित्र विसरून गेला. पण १९३५ मध्ये, म्हणजे ३५ वर्षांनंतर तो केतकरांना भेटला तेव्हा केतकरांनी सर्व पदें घडाघड म्हणून दाखविलीं ! वाचनाच्यापेक्षा केतकरांची लेखनाची तऱ्हा फार विचित्र होती. ते कोठेहि लिहीत, केव्हाहि लिहील आणि कशावरहि लिहीत. ट्रॅमची वाट पाहातांना, हॉटेलमध्ये किंवा एखाद्याच्या घरीं भेटावयास गेले असतांना ते सहज लिहूं शकत. भोवतालची धांदल, गडबड त्यांच्या लिहिण्यांत व्यत्यय आणूं शकत नसे. केव्हाहि त्यांच्या मनाची एकाग्रता होई आणि ते मागील संदर्भास धरून पुढे लिहूं शकत ! कधी कधी रात्रीं मध्येच उठून ते लिहीत आणि पुन्हा झोपीं जात. दिवसभर एखाद्या कारकुनाला तोंडाने मजकूर सांगून पुन्हा रात्रीं २५–३० पानें स्वतः लिहिणें म्हणजे त्यांच्या हातचा मळ असे ! त्यांच्या डोक्यांत विचा-रांची अशी गर्दी उसळे, की लेखणीला विचारांबरोबर धावतां धावतां पुरें होई. कोठेहि आणि केव्हाहि लिहिण्याच्या सवयीमुळे त्यांचें लिहिणें साहजिकपणेंच कशावरहि होत असे. फूलस्कॅप कागदावर,

नाना रंगांच्या कपट्यांवर, आणि विविध आकारांच्या तुकड्यातांकड्यांवर त्यांनी आपले मौल्यवान् लेख लिहिले. त्यांची बोलण्याची पद्धत तर मुळीच वक्तृत्वपूर्ण नव्हती. ते चाचपडत, सावकाश बोलत पण बोलतां बोलतां एखादा नवा विचार सांगून श्रोत्यांना थक्क मात्र करीत. एकंदरींत सभेमध्ये वागण्याचा रुबाब किंवा कला त्यांच्यापाशी नव्हतीच म्हटलें तरी चालेल. एकदा एका काव्य-गायनाचे समारंभांत अनेक प्रसिद्ध कवींनी आपापली कवने सुरेल आवाजांत गाऊन दाखविलीं; तेव्हा केतकरहि व्यासपीठावर विराजमान झाले आणि त्यांनी आपल्या बेसूर आवाजांत, आर्या वृत्तांतील आपली एक खडबडीत कविता म्हणून दाखविली. त्या वेळी कवितेने श्रोत्यांना रिझविले नाही पण केतकरांचा तो थाट बघून मात्र श्रोत्यांची खाशी करमणूक झाली !

विद्वान् असणारे केतकर बरेच विक्षिप्ताहि होते. ते मोठा गमतीदार पोषाख करीत. ते अमेरिकेंत शिक्षण घेऊन आणि युरोपखंडांत प्रवास करून आले होते. तेव्हा त्यांनी सुटाबुटांत राहावें, इस्त्रीची घडी बिघडेल म्हणून जपावें, हें साहजिक होतें. पण हिंदुस्थानांत आल्यावर त्यांनी आपल्या पोषाखाचा नूर पार पालटून टाकला. डोक्यावर झिरमिळ्याची लाल पगडी, अंगांत बंदाचा स्वच्छ अंगरखा, पायांत पाटलोण आणि खाली बूट किंवा जोडा—अशी त्यांची मूर्ति शोभूं लागली आणि त्यांच्या खांद्यावर उपरणेंहि खेळूं लागलें ! कधी ते ‘ टाय ’ बांधून खाली धोतर नेशीत आणि कधी सूटबूट पेहेरून पुण्याच्या बुधवार चौकांत किंवा आगगाडीच्या डब्यांत ज्ञानकोशाच्या जाहिराती वाटीत ! खाण्याचा तर त्यांना भारी शोक. विजारीच्या खिशांत भजीं ठेवून तीं खात रस्त्याने जाणारे केतकर पुण्याला अनेकांनी पाहिले आहेत. केतक-

रांना जेवण भरपूर लागे आणि एकदा जेवावयास बसले की ते मागे पुढे पाहात नसत. शेंगाचे भाजलेले दाणे आणि केळीं खात ते चित्रमंदिरांत खुशाल ' पिटा ' मध्ये जाऊन बसत. एकदा यवतमाळला व्याख्यान देतां देतां व्याख्यान ऐन रंगांत आलें असतां ते थांबले; आणि व्यवस्थापकांना म्हणाले, ' मला बुवा फार भूक लागली आहे ! ' व्यवस्थापकांनी चिवडा वगैरे जिन्नस मागविले तेव्हा ते इकडे खात, तिकडे केतकरांनी आपलें व्याख्यान चालू ठेविले ! पोषाखातला आणि खाण्यापिण्यांतला असला विक्षिप्तपणा केतकर इतरत्रहि खुशाल चालू ठेवीत. इतिहासाचार्य राजवाडे, लाला लजपतराय, नरसोपंत केळकर याच्यासारख्यांची पात्रे त्यांनी आपल्या कादंबऱ्यांतून घातलीं आहेत आणि त्यांची गंमत करून सोडली आहे. त्यांचीं मते मार्मिक आणि सखोल असत पण तीं नवीन असल्यामुळे लोक त्यांना ' मुलखावेगळीं ' म्हणत. कित्येकदा खरोखरीच त्यांचीं मतें विक्षिप्त असत. उदाहरणार्थ, १९३५ च्या घटना–कायद्याने हिंदुस्थान स्वतंत्र झाला, असे त्यांना वाटे पण हिंदुस्थानांतल्या एकाहि पुढाऱ्याला तसे कधी वाटलें नाही. हिंदुस्थान स्वतंत्र व्हावा म्हणून त्यांनी भारतमंत्र्यावर फिर्याददेखील लावली होती ! ही फिर्याद लावून त्यांनी आपल्या विक्षिप्तपणावर जणू कळसच चढविला. केतकर असे विक्षिप्त होते खरे, पण त्यांच्या विक्षिप्तपणामुळे त्यांच्या विद्वत्तेला कमीपणा मुळीच येत नाही. डॉ. जॉन्सन किंवा इतिहासाचार्य राजवाडे किंवा राजारामशास्त्री भागवत हे गाढे पंडित असेच विक्षिप्त होते. अनेक विद्वानांच्या स्वभावात ती एक तऱ्हा असते एवढेंच. पण या तऱ्हेमुळेच ते विद्वान् आपणांला जवळचे वाटतात आणि त्यांच्याविषयी आपणांला गंमत वाटून प्रेम उत्पन्न होतें.

विद्वान् समाजापासून फटकून वागतात, असा सर्वसाधारण समज आहे. डॉ. बेलवलकर आणि डॉ. भांडारकर यांच्याकडे पाहिलें, की हा समज खरा असावा, असें वाटूं लागतें. राजवाडे तर इतके तुसडे होते, की लोकांचा संपर्क नको म्हणून ते एक शिडी लावून घराच्या माळ्यावर चढत आणि मग शिडी वर ओढून घेत. हेतु हा, की लोकांनी येऊं नये आणि माळ्यावर आपलें काम आपणांस स्वस्थपणें करतां यावें ! केतकर विद्वान् होते पण एकलकोंडे नव्हते, आणि तुसडे तर मुळीच नव्हते. सर्व समाजांत ते मिळून मिसळून वागत, विद्वत्तेची प्रौढी त्यांच्या वागणुकीत चुकूनदेखील उमटत नसे. ते कोणत्याहि फडतुस उपाहारगृहांत चहा घेत; मुलांच्या छोट्या गणेशोत्सवांतहि व्याख्यान देण्याची त्यांची तयारी असे; घरांतल्या गडीमाणसांचीं सुखदुःखें ऐकून घेण्याचा त्यांना कंटाळा नसे आणि महाविद्यालयांतल्या तरुण विद्यार्थ्यांमध्ये खेळतांना त्यांना मौज वाटे.

ते मोकळे आणि कांहीसे भाबडे होते. त्याच्या जें मनांत येई ते ओठाबाहेर पडे; पोटांत कांही राहात नसे. लोक त्यामुळे त्यांच्यावर रागावत, पण केतकर सर्व विसरून जात. तत्त्वाचा प्रश्न आला म्हणजे मात्र ते मेरूसारखे खंबीर असत. न्यायमूर्ति रानडयांसारख्या वडीलधाऱ्या पुढाऱ्यावर टीका करतांना लोकमान्य टिळकांनी जसला बेडरपणा दाखविला तसला बेडरपणा केतकरांनी अनेकदा दाखविला. हिंदुस्थानांतले अनेक विद्वान्, हिंदुस्थानाबाहेरचे अनेक विद्वान् आणि महाराष्ट्रांतले कित्येक पुढारी यांच्यावर केतकरांनी निकराचे हल्ले चढविले व विद्वत्तेच्या रणक्षेत्रांत आपल्या शौर्याचें तेज दाखविलें. अनेक व्यवहार उरकतांनादेखील त्यांचा धाडसीपणा सहज चमकून जाई. ते

अमेरिकेंत गेले तेव्हा त्यांच्या खिशांत फक्त सहाशे रुपयेच होते ! आणखी पैसे मिळण्याची आशा नव्हती, पण सातासमुद्रापलीकडील देशांत त्यांनी बेदिक्कत उडी झोकून दिली. ज्ञानकोशासाठी छपाईचें यंत्र विकत घ्यावयाचें होतें, तेव्हा त्यांच्याजवळ केवळ शंभर रुपये होते. पण तेवढे पैसे अगाऊ भरून त्यांनी चार हजार रुपयांचें यंत्र मागविलें ! हैद्राबादचें साहित्यसंमेलन त्यांच्या अध्यक्षतेखाली पार पडलें, त्या वेळीं खुद्द निजामाच्या राजधानींत त्यांनी भाषणामध्ये निजामाचे चांगले कान उपटले ! ते असे धाडसी होते म्हणून मोठीं कामें त्यानी शिरावर घेतलीं आणि तडीस नेलीं. "साहसे श्रीः प्रतिवसति।" असें सुभाषित आहे. ते कांही खोटें नाही. त्यांच्या मनमोकळेपणाचा लाभ असा झाला, की समाजाचें सर्व प्रकारचें निरीक्षण ते करूं शकले आणि त्यांच्या समाजशास्त्रावरील लिहिण्याला भरीवपणा आला.

पुस्तकांतच पडून राहाणाऱ्या माणसांना शारीरिक श्रमाची बहुधा नावड असते. शाळेंतल्या आणि महाविद्यालयांतल्या विद्यार्थ्यांना खोरें-कुदळ घेऊन खणायला लावलें तर ते नाखूष होतील आणि झाडणी घेऊन रस्ते झाडा म्हणून म्हटलें तर नाकेंच मुरडतील. पण केतकरांचें तसें नव्हतें. त्यांना कष्टाचीं कामें करण्यांत मुळीच कमीपणा वाटत नसे. अमेरिकेंत विद्यार्थी असतांना पंप हलविण्याचें काम करूनदेखील त्यांनी विद्येसाठीं पैसा मिळविला होता. ज्ञानकोशाचे गठ्ठे खाकेंत मारून ते घरोघर हिंडत आणि ज्ञानकोशाची विक्री करीत. मुंबईला काम करीत असतांना ते कित्येकदा सकाळीं आठला घराबाहेर पडत ते रात्रीं दहाला घरीं परत येत ! चौदा तास त्यांच्या पायाला खळ नसे. मग मिळेल तेथे ते जेवण घेत आणि पावसाने कपडे भिजले तर अंगा-

वरच वाळवीत. त्यांनी ज्ञानकोश खपविण्यांत एवढी मेहनत घेतली, की १०० ते १५० रुपये किंमतीचें हें पुस्तक पण त्याच्या सुमारें दोन हजार प्रती त्यांनी एकट्यानें खपविल्या. महाराष्ट्रांत खूप काम करणारीं जीं माणसें होऊन गेलीं त्यांत केतकरांचें नांव वगळून चाल-णार नाही. स्वतःचीं पुस्तकें स्वतःच खपविण्याचा पायंडा केतकरांनीच महाराष्ट्रांत पाडला.

सर्व कर्तृत्ववान् पुरुषांप्रमाणे केतकर फार आशावादी होते. निरा-शेचा विटाळ त्यांच्या मनाला सहसा होतच नसे. लहानपणीं वडील वारले, आई मृत्युमुखीं पडली, थोरली बहीण दिवंगत झाली, पुढे थोरला भाऊहि वारला पण ते खिन्न झाले नाहीत. स्वदेशासाठी ज्ञान मिळवावें म्हणून ते अमेरिकेंत गेले आणि तेथून उच्च पदवी मिळवून आले. त्यांची आई पटकीने अचानक वारली तेव्हा ते मॅट्रिकच्या वर्गात होते. आईच्या मृत्यूच्या दिवशी ते शाळेत गेले नाहीत पण दुसऱ्या दिवशीं एक कविता गुणगुणत त्यांनी वर्गांत प्रवेश केला. एका विद्यार्थ्याला त्यांच्या आईच्या मृत्यूची बातमी खोटी कीं काय, अशी त्यामुळे शंकासुद्धा आली. तेव्हा त्याने बिचकत विचारलें, "काय रे केतकर, आईची प्रकृति कशी काय आहे ?" केतकरांनी शांतपणें उत्तर दिलें, "आई कालच वारली." तो विद्यार्थी बोलला, "तुझ्या चेहऱ्यावरून तसें वाटत नाही," तेव्हा केतकर काय उत्तरले ठाऊक आहे ! ते म्हणाले, "कसा चेहरा करूं म्हणजे आई वारली, असें तुला वाटेल !" केतकरांच्या या उत्तरांत त्यांच्या मनाचा विचित्रपणा जसा दिसतो तसाच त्यांचा दुर्दम्य आशावादहि दिसतो. वडील, आई, किंवा बहीण वारल्यामुळे ते कुढत बसले नाहीत

तर आपल्यामागे आता कशाचा पाश नाही, आपण अपार ज्ञान आता मनसोक्तपणें मिळवूं या, असे ते म्हणाले. ज्ञानकोश काढतांना आणि पुढेहि, दारिद्र्याने त्यांना फार गांजलें. पण ते खट्ट कधीच झाले नाहीत. कित्येक वेळा ते पैशाच्या अडचणींत इतके असत, की एक वेळेच्या जेवणाचे पैसेहि त्यांच्यापाशी नसत. मग चहा आणि पाव खाऊन ते वेळ भागवीत किंवा मित्राने दिलेल्या फराळावरच आनंद मानीत. या थोर पुरुषाला तयार कपड्यांच्या दुकानांतला सूट घालण्याची पाळी येई आणि तळवे नसलेले बूट घालून वणवण फिरावें लागे. पण ते सदा हसतमुख, सदा आनंदी आणि सदा आशावादी असत. तसल्या दारिद्र्यांत सामान्य माणसाला संसारसुद्धा सुचला नसता पण केतकरांनी अमोल ग्रंथ त्या वेळीं लिहिले ! 'आशावादी' या नांवाची एक कादंबरी केतकरांनी लिहिली आहे; तीमधील एका पात्रावरून आणि त्यांच्या स्वभावावरून त्यांचे मित्र अनेकदा त्यांना 'आशावादी' असेंच म्हणत.

त्यांच्या सर्व आयुष्यभर एक भावना सदैव जागृत होती आणि ती भावना त्यांच्या सर्व कामांना प्रेरणा देत होती. ती भावना म्हणजे त्यांची देशभक्ति. केतकर नुसते विद्वान् असते तर त्यांच्याविषयी आदर वाटला असता; ते विद्वान् असून कर्तृत्ववान् असते तर आदर द्विगुणित झाला असता; पण ते विद्वान् होते, कर्तृत्ववान् होते आणि देशभक्तहि होते. त्यामुळे त्यांच्याविषयीचा आदर शतगुणित होतो. केतकरांना हिंदुस्थानचा मोठा अभिमान होता; हिन्दु संस्कृतीबद्दल त्यांना फार प्रेम वाटे आणि मराठी भाषेबद्दलची त्यांची आपुलकी उघड होती. अमेरिकेंत पदवी मिळाल्यावर तिकडेच प्राध्यापक होण्याचा

मान त्यांना मिळत होता. पण हिन्दुस्थानच्या प्रेमामुळे त्या मानाची कदर त्यांनी बाळगळी नाही. आपल्या ज्ञानाचा फायदा आपल्या लोकांना मिळावा म्हणून त्यांनी हिदुस्थानचा किनारा गाठला. येथे आल्यावर त्यांना कोणत्याहि महाविद्यालयांत सुखाची नोकरी करून स्वस्थपणें राहातां आलें असतें. कलकत्ता विद्यापीठाने त्यांना पदवीधर विद्यार्थ्यांना राज्यशास्त्र व अर्थशास्त्र शिकविण्यासाठी नेमूनहि घेतलें होते. पण देशाचे जें काम कोणी करीत नाही, किंवा जे करूं म्हटलें तरी करतां येणें फार कठीण असतें तें काम करण्याची त्यांची इच्छा होती. म्हणूनच सुखावर व स्वास्थ्यावर पाणी सोडून जन्मभर दारिद्र्याशीं झगडत ते ज्ञानसंग्रह करीत राहिले आणि नवे विचार सांगत राहिले. देशासाठी जे फासावर लटकतात त्यांची देशभक्ति आणि केतकरांची देशभक्ति या निरनिराळ्या ठिकाणीं चमकल्या असतील पण त्यांच्या उत्कटतेंत मुळीच फरक नाही. केतकरांना आपल्या हिंदू समाजाबद्दल एवढें प्रेम असे, की हिंदूंच्या इतिहासावर, त्यांच्या प्रगतीच्या विचारावर वगैरे त्यांनी शेकडो पृष्ठें लिहून काढलीं. आपल्या युरोपीय पत्नीला त्यांनी प्रथम हिंदु करून घेतलें आणि मगच तिच्याशीं लग्न केलें. मराठी भाषेवरील प्रेमाने त्यांनी आपले बहुतेक लिखाण मराठींतच केलें. त्यांच्या लिखाणाने मराठी भाषा मोठी झाली. त्यांनी मराठीऐवजी इंग्रजींत लिहिलें असतें तर जगभर त्यांच्या विद्वत्तेचा डंका वाजला असता. वेदांचा अभ्यास करणारा पट्टीचा अभ्यासक, समाजशास्त्रावर थोर विचार सांगणारा विवेचक म्हणून जगाने त्यांच्यावर स्तुतीचीं फुलें उधळलीं असतीं. पण मराठीच्या प्रेमाखातर त्यांनी या सर्वांचा लोभ दूर लोटला. केतकरांनी स्वदेश, स्वधर्म, स्वभाषा यांच्या अभिमानाची भर-

केदार व्याख्यानें कधी दिलीं नाहीत, परंतु त्यांचा स्वाभिमान अस्सल बावनकशी होता.

मग, अशा थोर पुरुषाचें चरित्र समजावून घ्यावें, असें तुम्हांला नाही का वाटत ?

---

## अभ्यास

१ मराठी भाषेच्या इतिहासामध्ये केतकरानी गाजविलेला अभूतपूर्व पराक्रम कोणता ? त्याचें वर्णन करा.

२. "ज्ञानकोशाच्या मलपृष्ठात मावण्याइतके ते लहान मात्र नव्हते" म्हणजे काय ?

३. केतकराची स्मरणशक्ति, धाडस व विक्षिप्तपणा याचें एकेक उदाहरण द्या.

४. केतकराची देशभक्ति कोठे कोठे दिसून आली ?

## २. विद्याभ्यास

केतकर एक आदर्श विद्यार्थी होते. सामान्य विद्यार्थ्यांहून अभ्यास करण्याच्या त्यांच्या तऱ्हा अगदी वेगळ्या होत्या. सामान्य विद्यार्थी पुस्तकें आणि शिक्षकांनी दिलेलीं टिपणें किंवा 'दीपिका' घोकतो, बसेल तेवढी माहिती डोक्यांत कोंबतो आणि ती पेपरांत नेऊन ओततो. त्याचे बहुतेक ज्ञान प्रथम वहींत, मग डोक्यांत आणि मग पेपरामध्ये असते. परीक्षेनंतर तो कोरडा ठणठणीत असतो. पाठ्य पुस्तकांबाहेर त्याची नजर क्वचितच जाते, आणि स्वतः विचार करण्याची कुवत तो कधीच कमावत नाही. टिपणें व 'दीपिका' यांच्या पांगुळगाड्या-शिवाय त्याचें पाऊल पुढे पडणें कठीण. पण केतकरांसारखे जे खरेखुरे विद्यार्थी असतात त्यांचा प्रकार कांही वेगळाच असतो. ते परीक्षेपेक्षा खऱ्या ज्ञानाला महत्त्व देतात आणि परीक्षा संपल्या तरी त्यांचा अभ्यास संपत नाही. पुस्तकांतलें ज्ञान पेपरांत नेऊन वाढणारीं ओगराळीं म्हणजे आपलीं डोकीं, अशी त्यांची समजूत नसते. ज्ञानाचें बीं आपल्या मेंदूंत रुजावें आणि त्यांतून नव्या ज्ञानाचे शेकडो तरु फुटावेत, असें त्यांना

वाटतें. ज्याना आदर्श विद्यार्थी व्हावयाचें असेल त्यांनी केतकरांसारख्या विद्यार्थ्यांची अभ्यासाची पद्धत याकरिताच जाणली पाहिजे.

मध्यप्रांतांतील उमरावती गावीं केतकरांचें मॅट्रिकपर्यंत शिक्षण होऊन १९०० सालीं ते मॅट्रिक झाले. शाळेंत ते खूप अभ्यास करीत. ९ वी-मध्येच त्यांनी १० वीचा अभ्यास केला होता आणि १० वीचे पेपर लिहिले होते ! आश्चर्य असें, की बऱ्याच पेपरांत त्या वेळीं त्यांना उत्तम गुण मिळाले. मध्यप्रांतांत मराठीची एक शिष्यवृत्ति असे; कोणाहि विद्यार्थ्याला ती शिष्यवृत्ति मिळविण्यासाठी परीक्षेस बसता येई. जो पहिला किंवा दुसरा येईल त्याला एक वर्ष कांही रुपये शिष्यवृत्तीदाखल मिळत. या परीक्षेला पुस्तकें नेमलेलीं नसत, सर्वसामान्य प्रश्न येत आणि एक प्रश्न दिलेल्या विषयावर पद्यांत उत्तर देण्याचा असे. केत-करांचें अवांतर वाचन पुष्कळ असल्यामुळे ते या परीक्षेत पहिले आले. शाळेंत असतांनाच कृष्णशास्त्री चिपळूणकर, चितामणिपेठकर, परशुरामतात्या गोडबोले, गणेशशास्त्री लेले वगैरे आधुनिक कवि त्यांनी वाचले होते आणि मोरोपंत, वामन, मुक्तेश्वर, रघुनाथपंडित इत्यादि जुन्या कवींशीं त्यांचा परिचय झाला होता. कृष्णशास्त्र्यांचे व्याकरणावरील निबंध, नवनीत, गणेशशास्त्री लेल्यांचें साहित्यशास्त्र, शाकुतल–सौभद्र–आदि नाटकें हींहि त्यांच्या दृष्टींतून सुटलीं नव्हतीं. त्यांच्या घरांत पुष्कळ जुन्या पोथ्या होत्या, त्या चाळून त्यांवरून त्यांनी शिवरामस्वामी नांवाच्या एका जुन्या कवीवर 'वऱ्हाड समाचारांत' लेख लिहिला होता. केतकरांनी वाचलेल्या कवींच्या पुस्तकांचीं नांवें तरी तुम्हांला माहीत आहेत का ? साहित्यशास्त्र म्हणजे काय बरें ? शाकुंतल कोणीं लिहिलें ? सौभद्राचे लेखक कोण ? या प्रश्नांचीं उत्तरें

देण्याचा तुम्ही प्रयत्न करा, म्हणजे शाळेमध्ये केतकरांचें वाचन किती विस्तृत होतें, याची कांहीशी कल्पना येईल. केतकरांच्या वाचनाचें आणि बहुश्रुतपणाचें त्यांच्या गुरुजींनाहि मोठें कौतुक वाटे. " चालता बोलता ज्ञानकोश " अशी पदवीच एका गुरूजींनी त्यांना दिली होती. त्यांची बुद्धि सर्व विषयांत सहजपणें शिरे आणि तेथे सूक्ष्म विचार करी. त्रिकोण आणि समांतरभुजचौकोन यांच्याविषयी भूमितींत दोन प्रमेयें आहेत. दोन त्रिकोण एकाच पायावर उभे असतील व दोन समांतर रेषांत असतील तर त्यांचें क्षेत्रफळ सारखेंच असतें, असें पहिलें प्रमेय आहे. दुसरें प्रमेय असेंच आहे पण तें दोन समांतरभुजचौकोनांबद्दल आहे. तुम्हीं हीं प्रमेयें बहुधा सोडविलीं असतील. पण तुमच्या कधी हें ध्यानांत आलें का, की तीं प्रमेयें घालण्यांत एक चूक झाली आहे ! ती चूक तुम्ही काढा बघूं हुडकून. केतकरांनी आपल्या गुरुजींना ही चूक दाखवून थक्क करून सोडलें होतें.

केतकरांचें वाचन जबर असे. १९०० सालीं मॅट्रिक होऊन ते मुंबईच्या विल्सन महाविद्यालयांत गेले; तेव्हा त्यांच्या वाचनाला विशेषच जोर चढला. ज्या प्राध्यापकांचीं व्याख्यानें सामान्य दर्जाचीं होत त्या प्राध्यापकांचे तास ते चुकवीत आणि आपल्या खोलींत वाचनामध्ये दंग होऊन जात. नेमलेलीं पुस्तकें घोकण्याकडे त्यांचा कल नसे. परीक्षा जवळ आली म्हणजे नेमलेल्या पुस्तकांची चौकशी ते करीत आणि तीं वाचून उत्तीर्ण होण्याचा १–२ महिने प्रयत्न करीत. ते १९०६ सालीं अमेरिकेंत गेले व १९११ सालीं तेथून परतले. त्या पांच वर्षांत त्यांनी केलेलें वाचन पाहून कोणीहि मनुष्य तोंडांत बोटच घालील. ते ज्या कॉर्नेल विद्यापीठांत शिकत तेथल्या

ग्रंथालयांत सुमारें आठ लाख ग्रंथ होते ! फार मोठें ग्रंथालय होतें तें ! सकाळीं आठपासून रात्रीं अकरा वाजेपर्यंत, पंधरा तास तें पूर्ण उघडें असे. पदवीधर विद्यार्थ्यांना त्याचा उपयोग करण्यांत पुष्कळ स्वातंत्र्य मिळे. केतकरानी या ग्रंथालयांत जवळ जवळ वस्तीच केली होती. त्यांना वाटे, की असें ग्रंथालय हिंदुस्थानांत पाहायलासुद्धा मिळणार नाही; आता संधि आहे तोवर वाचून घेतलें पाहिजे. म्हणून ते अधाशीपणाने वाचीत राहिले. त्या पांच वर्षांत त्यांनी जेवढीं पुस्तकें वाचलीं किंवा चाळलीं तेवढीं त्या विद्यापीठातील एकाहि विद्यार्थ्याने किंवा शिक्षकाने चाळलीं नसतील ! ग्रंथालयाचा उपयोग कसा करावा, याचें एक शास्त्र आहे. आठ लाख पुस्तकाच्या गर्दींत नेमकें पुस्तक कसें हुडकणार ? पुस्तकाचें नांव माहीत नसेल व लेखकाचेंच माहीत असेल तर काय करणार ? एखाद्या विशिष्ट विषयाची माहिती हवी असेल तर ती कोठे पाहाणार ? जाडे पुस्तक पूर्ण न वाचतां त्याचा मथितार्थ चटकन् कसा मिळवणार ? ग्रंथांच्या उपयोगाचे शास्त्र शिकल्याने हें सर्व कळतें. यासाठी ‘ ग्रंथोपयोगशास्त्र ’ आणि ‘ ग्रंथवर्णनशास्त्र ’ यांवरील काही व्याख्यानें केतकरांनी अभ्यासलीं होतीं. त्यामुळे थोड्या वेळांत पुष्कळ गोष्टी त्यांना समजल्या आणि त्यांच्या अभ्यासाला शिस्त लागली. ज्याला पुष्कळ अभ्यास करावयाचा असेल त्याने ग्रंथालयाचा उपयोग करण्याचें शास्त्र अवश्य शिकलें पाहिजे. अमेरिकेहून परत आल्यावर, अनेक कामांच्या पसाऱ्यांत केतकरांचें वाचन चालूच होतें.

परीक्षांचें महत्त्व केतकरांना कधीहि वाटलें नाही. परीक्षांवरून माणसाचें महत्त्व मापणाऱ्यांना ते ‘ परीक्षामोजू ’ अशी शिवी देत.

त्यांनी परीक्षांकडे इतकें दुर्लक्ष केलें, की ते अनेकदा नापास झाले
प्रथमतः इंटरमध्ये त्यांनी गोता खाल्ला. मग ज्यूनिअर बी. ए. च्या वर्गांत
असतां ते फर्स्ट एल्‌एल्. बी. ला बसले तेव्हा त्यांना दुसरें अपयश
आले. बी. ए. च्या परीक्षेंत ते अनुत्तीर्णच झाले. पीएच्. डी. च्या
वेळींहि पहिल्या प्रथम त्यांना पदवी मिळाली नाही. म्हणजे एकूण चा
वेळा ते खाली राहिले ! केतकर एवढे हुशार, एवढे व्यासंगी मग अ
कां बरें झालें ? त्याचें कारण असें होते, की शाळेतल्या ठरीव चाकोरी
तून न शिकतां ते स्वतःच्या मार्गानें स्वतंत्रपणें शिकत होते. क
देशभक्तीच्या उद्योगांत त्यांना अभ्यासाचा विसर पडत होता, कधी यो
शिकण्यामध्ये तल्लीन होऊन ते परीक्षेकडे दुर्लक्ष करीत होते, कधी इत
वाचनाच्या गंगेंत डुंबतां डुंबतां नेमलेल्या पुस्तकांच्या डबक्यांत बु
मारणें त्यांच्या जीवावर येत होतें. बरे, भराभर परीक्षा देऊन नोक
धरण्याची त्यांना घाई नव्हती; कारण ज्यांच्यासाठी नोकरी करावी अ
त्यांचे आप्तेष्ट मृत्युमुखीं पडलेले होते. त्यामुळे जेव्हा ज्यांत गोडी वाटे
त्यांत ते रममाण झाले; तेथले अस्सल ज्ञान त्यांनी मिळवलें आणि प
क्षांत ते नापास होत गेले. त्यांनी अमेरिकेस जाणाऱ्या बोटींत प
ठेवला तेव्हा ते बी. ए. देखील झालेले नव्हते ! त्यांना परीक्षेची फिक
रच नव्हती. स्वतःच्या ज्ञानाबद्दल मात्र त्यांना पक्का विश्वास होत
त्यामुळे ते तसेच अमेरिकेस गेले आणि तेथे बी. ए. व एम्. ए. या परी
तीन वर्षांत त्यांनी उरकल्या.

पीएच्. डी. च्या परीक्षेंत ते कसे नापास झाले, हें पाहाणें बोधप्र
आहे. १९०९ साली त्यांनी पीएच्. डी. पदवीसाठी लागणारा आप
प्रबंध लिहून पुरा केला आणि विद्यापीठाने त्याला मान्यताहि दिली.

नेमलेलें वाचन आणि फ्रेंच भाषेचा अभ्यास त्यांनी पुरा न केल्यामुळे १९१० च्या पदवीदानप्रसंगीं त्यांना डॉक्टरेटची पदवी नाकारण्यांत आली. प्रबंध दिल्यानंतर नेमलेलें वाचन आणि फ्रेंचचा अभ्यास त्यांनी करावयास पाहिजे होता पण त्या वेळीं त्यांचे विचार वेगळ्याच दिशेने वाहूं लागले. आपल्या विषयाचा अभ्यास आपण स्वतंत्रपणें करूं शकूं; तेव्हा ज्या विषयांत इतरांची मदत लागेल असे विषय, संधि आहे तोंवर, शिकून घ्यावे, असें त्यांनी ठरविलें. मग भूस्तरशास्त्र, जीविशास्त्र, पुस्तकवर्णनशास्त्र, इतिहाससंशोधनशास्त्र, पुराणवस्तुशास्त्र इत्यादि विषयांच्या विद्यापीठांतील व्याख्यानांना ते जाऊं लागले! त्याच विषयांचा अभ्यास त्यांनी चालवला, त्यांतच ते रंगले आणि पदवीला मुकून बसले. मात्र पदवी हुकली तरी अनेक विषयांचा अभ्यास झाल्याने ज्ञानकोशाचें महत्कार्य उरकण्याचें बळ त्यांच्या अंगी नक्की आलें. हिंदुस्थानांत तेव्हा प्रौढ विवाहाला प्रारंभ होत होता आणि अमेरिकेंत प्रौढ विवाह सर्रास चालू होता. तेव्हा प्रौढ विवाहाने आपल्या हिंदुस्थानचा फायदा होईल कीं तोटा होईल, असा प्रश्न त्यांच्या मनांत घोळत होता. यासाठी, प्रौढ विवाहाचे परिणाम पाहाण्याच्या उद्देशाने त्यांनी तीन गावांचें संशोधन अमेरिकेंत केलें. या संशोधनामुळेंहि त्यांचें अभ्यासाकडे दुर्लक्ष झालें.

केतकर चार परीक्षांत नापास कां झाले, याचा इतिहास असा विचित्र आहे. त्यांच्या नापास होण्यांत त्यांची ज्ञानाची तहानच स्पष्ट दिसते. केतकरांसारखीं माणसें नापास होतात तेव्हा त्यांच्या ज्ञानाच्या भुकेला परीक्षेचीं पुस्तकें क्षुद्र वाटतात, हें एक कारण असतें. त्यामुळे असें नापास होणें दूषण नसून भूषणच आहे! लोकमान्य टिळक एम्. ए. च्या परीक्षेंत असेच नापास झाले होते. विद्यार्थ्यांनी नापास व्हावें, पण

केतकरांसारखें किंवा टिळकांसारखें नापास व्हावें. परीक्षेचीं चार पुस्तकें पेलत नाहीत म्हणून क्षुद्रपणानें नापास होण्यांत काय मोठेपणा आहे ?

केतकरांनी अमेरिकेंतला अभ्यास स्वावलंबनाच्या बळावर पार पाडला, ही गोष्ट विशेष महत्त्वाची आहे. ते अमेरिकेंत गेले तेव्हा फक्त ६०० रुपये त्यांच्यापाशी होते, पण हे पैसे १–२ महिन्यांतच संपून गेले असतील. बडोद्याच्या सयाजीराव महाराज गायकवाडांनी त्याना एक शिष्यवृत्ति तीन वर्षे चालू ठेविली होती. पण शिष्यवृत्तीवर त्यांचा सर्व निर्वाह कसा होणार !–आणि शिष्यवृत्ति तीन वर्षे मिळाली तर त्यांना अमेरिकेंत राहावें लागलें पांच वर्षे. तेव्हा उपजीविकेसाठी मजुरी करण्यावाचून त्यांना गत्यंतर नव्हतें. त्यांनी पंप हलवून बागांना पाणी दिलें; शेतांत बटाटे उपटले; कॅमेऱ्याच्या कारखान्यांत कागदी खोके तयार केले, वाढप्याचें काम केलें; वसतिगृहांत ताटवाट्या साफ केल्या; किरकोळ माल घरोघर नेऊन विकला; अमेरिकन ज्ञानकोशासाठी गिऱ्हाइकें मिळवली आणि नाना उद्योग करून विद्येसाठी पैसा उभा केला. हीं कामें करतांना त्यांना लाज मुळीच वाटली नाही; कारण पोकळ नखरा त्यांना पसंत नव्हता. जे विद्यार्थी गरीब असतील व ज्यांना अभ्यासाची उमेद असेल त्यांनी केतकरांचें उदाहरण डोळ्यांसमोर ठेवावें. केतकरांनी जर गरिबींत अमेरिकेंत जाऊन उच्च पदवी मिळवली तर इतरांना तसें करणे अगदीच अशक्य नाही. "उद्योगिनं पुरुषसिंहमुपैति लक्ष्मीः।" हें जसें खरें आहे तसेंच "उद्योगिनं पुरुषसिंहमुपैति विद्या।" हेंहि खरें आहे.

पुस्तकी अभ्यासाला अनुभवाची जोड दिल्याशिवाय पूर्णता येत नाही. यासाठीच पदार्थविज्ञान किंवा रसायन यांची पुस्तकांतली

माहिती मिळवितां मिळवितां आपण हातांनी प्रयोग करून पाहातों. केतकर ही रीत सर्वच अभ्यासाला लावीत असत. अमेरिका खंड, युरोप खंड, सीलोन, ब्रह्मदेश इत्यादि ठिकाणीं याकरिताच त्यांनी प्रवास केला. हिंदुस्थानांतले बरेच भाग त्यांनी दृष्टीखाली घातले. ज्या देशांत जावयाचें त्याची बरीचशी ऐतिहासिक, सामाजिक व भौगोलिक माहिती ते अगोदरच वाचून ठेवीत. मग त्या देशांत गेल्यावर वाचलेली माहिती प्रत्यक्ष परिस्थितीशीं ते पडताळून पाहात, आपल्या विचारांचा खरेखोटेपणा ते तपाशीत आणि वस्तुस्थितीवरून मतें बनवीत. त्यांची निरीक्षणशक्ति फार सूक्ष्म आणि फार मोठी होती. ते पंधरवडाभरच सीलोनमध्ये होते पण तेथल्या लोकांचें त्यांनी असें वर्णन करून ठेवलें, की जणू ते १–२ वर्षें सीलोनमध्ये होते ! नाना देश, नाना समाज पाहिल्यामुळे कोणत्याहि देशाचें किंवा समाजाचें वैशिष्ट्य त्यांच्या चटकन् लक्षांत भरे. प्रत्यक्ष अमेरिकन लोकांपेक्षा अमेरिकेतल्या विवाहपद्धतींची माहिती त्यांना जास्त असे. ज्ञानकोश संपल्यानंतर महाराष्ट्राचा प्राचीन इतिहास लिहिण्यास त्यांनी घेतला. तेव्हा दिल्लीपासून सोपाऱ्यापर्यंत अनेक ऐतिहासिक स्थळांना त्यांनी प्रत्यक्ष भेटी दिल्या. छोटा लेख लिहावयाचा झाला तरी प्रत्यक्ष अवलोकनाची सक्त मेहनत घेण्यास ते अनमान करीत नसत. मोठमोठे पुस्तकी पंडित केतकरांच्या पुढे फिके पडत, याचें कारण केतकरांचें अवलोकन होय. अमेरिकेंत विद्यार्थिदशेमध्येदेखील विख्यात समाजशास्त्रज्ञ घेंडांशीं त्यांनी दोन हात केले आणि त्यांच्या तोंडचें पाणी पळवलें. कारण त्या समाजशास्त्रज्ञांनी नुसती अमेरिकाच पाहिली होती तर केतकरांनी पौर्वात्य जग बघून शिवाय पाश्चात्य जगहि पाहिलें होतें.

केतकरांच्या अभ्यासाच्या कांही खुब्या ध्यानांत ठेवण्यासारख्या आहेत. त्यांच्या टेबलावर कोऱ्या चिठ्यांची चवड ठेवलेली असे. कोणताहि महत्त्वाचा मुद्दा डोक्यांत आला रे आला, की लगेच एका चिठीवर ते तो टिपून ठेवीत. अशा प्रकारें लिहिलेल्या चिठ्या टेबलावर चिताड पसरलेल्या असत. पक्का लेख तयार करण्यापूर्वी ते या चिठ्या जुळवून, त्यांत भर घालून तो तयार करीत. या पद्धतीमुळे डोक्यांतला कोणताहि विचार वाया जात नाही आणि प्रत्येक विचारांतलें तारतम्य व अनुक्रम ठरवणें सोपें जातें. कोणतेंहि विधान करतांना आकडेशास्त्राची मदत घेण्याचा त्यांचा यत्न असे. त्यांनी एकदा असें लिहिलें, की हिंदुस्थानांतल्या इतर अनेक प्रांतांच्या मानाने व विशेषतः गुजरात व बंगाल यांच्या मानाने महाराष्ट्र अशिक्षित आहे. ठिकाठिकाणचे साक्षरतेचे आणि पुस्तकप्रकाशनाचे आकडे देऊन त्यानी आपले म्हणणें सिद्ध केलें होते. महाराष्ट्राला अशिक्षित म्हटल्याबद्दल दुरभिमानी लोक त्यांच्यावर चिडले पण त्यांच्या म्हणण्याला आकड्यांचा आधार असल्याने त्या लोकांना बोटें मोडीत बसण्यापलीकडे कांही करतां आलें नाही. मोठा अभ्यास करतेवेळीं केतकर इतर विद्वानांना हाताशीं धरीत, त्याना कामें वाटून देत, त्यांच्या अभ्यासांतून जें निष्पन्न होईल त्यावर स्वतः विचार करीत आणि मग आपलीं मतें बनवीत. एखाद्या विषयावर पूर्वपक्ष उत्तरपक्ष करून मग निर्णय घेण्याचाहि उपक्रम ते करीत. वेदांचें फार मोठें संशोधन १९१९ पासून १९२२ पर्यंत त्यांनी केलें, तेव्हा याच रीतीने त्यांनी अभ्यास केला. जेव्हा विषय फार व्यापक असतो तेव्हा अशी श्रमविभागणी केल्याशिवाय अभ्यासाचा उरक पडत नाही.

जाणिवेच्या प्रारंभापासून अंतापर्यंत केतकर विद्यार्थी होते. प्रत्येक गोष्टींतून ज्ञान मिळविण्याची त्यांची वृत्ति असे. त्यांच्या घरांत भुताटकी सुरू होऊन त्यांच्या मुलाला त्रास होऊं लागला; घरांतल्या वस्तु आपोआप धावूं-पळूं लागल्या; तेव्हा त्यानी भुताटकीचाच अभ्यास चालू केला! भुताटकीवर एक ग्रंथ लिहिण्याचा त्यांचा विचार होता. आफ्रिकेंत घायपाताचे मळे असतात, असें त्यांच्या एका मित्राने सांगितलें; तेव्हा आपल्या बंगल्याभोवती त्यांनी घायपाताची लागवड करून बघितली! पडीत जमिनींत घायपाताचें उत्पन्न काढतां येईल, अशी त्यांची कल्पना होती. गरीब स्त्रियांना कांही उद्योग द्यावा म्हणून 'स्त्रीकर्मसदन' नांवाची एक संस्था त्यांनी काढली. तेथे स्त्रियांकडून कपडे शिवून घेतले जात. त्या संस्थेंत १२०० रुपयांची बूड येऊन ती बंद करावी लागली. पण केतकरांना वाईट वाटलें नाही. जें अनुभवाचें ज्ञान मिळालें तें त्यांना १२०० रुपयांहून मूल्यवान् वाटलें! लोकमान्य टिळक तुरुंगांत असतां लोकर रंगविण्याचें काम त्यांना मिळालें; तेव्हा रंगारी कामावरचीं पुस्तकें मागवून त्यांनी त्यांचा अभ्यास केला. ज्ञानार्जनामधील टिळकांची ही वृत्ति व केतकरांची वृत्ति सारखीच होय. दोघेहि जन्मभर विद्यार्थी होते.

केतकरांच्या ज्ञानार्जनाच्या हौसेला तोड नव्हती. समाजशास्त्राला उपयोगी पडणारीं शास्त्रें म्हणून ते शासनशास्त्र व अर्थशास्त्र शिकले. समाजशास्त्र इतिहासाशिवाय अपूर्ण होय म्हणून त्यांनीं इतिहासाचा अभ्यास केला. इतिहासावर त्यांनी मोठाले ग्रंथहि लिहिले. आवडीखातर त्यांनीं काव्य लिहिलें व वाचलें. आपलें समाजशास्त्रीय ज्ञान सामान्य लोकांना कळावें, या उद्देशाने कादंबऱ्या रचल्या. कादंबऱ्या

व काव्य यांच्या मागोमाग साहित्यशास्त्र येतेंच. तेव्हा त्याचाहि त्यांनी समाचार घेतला. एका शास्त्रातले सिद्धान्त व विचार-पद्धति दुसऱ्या शास्त्रांत कशा लावतां येतील हे पाहाण्यासाठी जीविशास्त्र, भूस्तर-शास्त्र वगैरे अनोळखी प्रदेशांत ते शिरले. आकडेशास्त्राच्या आधारा-शिवाय ज्ञानाची इमारत डळमळीत राहाते म्हणून त्यांनी ते शास्त्र आत्मसात् केलें. संस्कृत भाषा मराठीची जननी होय, तेव्हा मराठीच्या उत्तम अभ्यासासाठी संस्कृत शिकणें त्यांना अवश्य वाटे. बरे, संस्कृतां-तल्या कथावाङ्मयाचीं मुळे प्राकृतांत आहेत, त्याकरिता अर्धमागधी, पाली आदिक भाषा शिकल्याच पाहिजेत. – आणि वेदांसारख्या संस्कृत ग्रंथांचा संबंध पार्श्यांच्या झेद–अवेस्ताशीं असल्यामुळे वेदांच्या अभ्यास-कांनी अवेस्ताची भाषाहि पचवली पाहिजे ! केतकरांच्या ज्ञानार्जनाचीं क्षितिजें अशीं सारखीं फाकत चाललीं होतीं. त्यांना ज्या विषयांबद्दल जिज्ञासा होती त्या विषयांचीं नुसतीं नांवे द्यावयाचीं म्हटले तरी एक विष्णुसहस्रनाम तयार होईल ! ज्ञानाची इतकी हौस असणारा विद्यार्थी लाखांत एखादाच सापडतो.

केतकरांचें सर्व आयुष्य ज्ञानाच्या उपासनेंत संपून गेले. पूर्वीच्या काळचे ऋषि ज्ञानासाठी आपल्या आयुष्याचा होम करीत. केतकरां-नीहि तसेंच केलें. पण केतकरांना ऋषि म्हटलें तर प्रथमतः चमत्का-रिक वाटेल. कारण त्यांनी जटा वाढवल्या नव्हत्या, अरण्यांत आश्रम बांधला नव्हता की राख फासून लंगोटी नेसली नव्हती. उलट ते स्वहस्तें दाढी करीत, सूटबूट घालीत आणि मडमेशी लग्न करून संसारांत रंगत. कंदमुळांच्याऐवजी ते भजीं खात, सोमरसाऐवजी चहा पीत आणि यज्ञीय बोकडाऐवजी वेळ पडल्यास खाटिकखान्यांतलें मांस

खात ! पण बाह्य वेषांत किंवा आचारांत ऋषीचें ऋषीपण असतें का ? ज्ञानाची अखंड उपासना करील तोच खरा ऋषि. जो ज्ञानाच्या आनंदांत दंग होऊन तहानभूक विसरेल तो ऋषि. या अर्थानें न्यूटन ऋषि होता, राजवाडे ऋषि होते, जगदीशचंद्र बोस ऋषि होते आणि केतकरहि ऋषि होते. फरक इतकाच की व्यास, वाल्मीकि पुरातन ऋषि होते तर हे आधुनिक ऋषि आहेत.

## अभ्यास

१, शाळेतले, महाविद्यालयातले आणि अमेरिकेतले केतकर डोळ्यासमोर आणून " केतकराचे वाचन जबर असे " या वाक्याचा क्रमश: खुलासा करा.

२. " त्याच्या नापास होण्यात त्याची ज्ञानाची तहानच स्पष्ट दिसते " — हें कसें ?

३. केतकराच्या अभ्यासाच्या पद्धतीत तुम्हाला जी वैशिष्ट्ये आढळतात त्याचें टाचण करा.

४. केतकराना ' आधुनिक ऋषि ' का म्हटले आहे ?

---

## ३. ज्ञानकोशाचें थोर कार्य

महर्षि व्यासांनी महाभारत रचलें तेव्हा त्यांनी त्या वेळचें नाना प्रकारचें ज्ञान व कथा गोळा करून आपल्या ग्रंथांत घातल्या. व्यास हे एक प्रकारचे ज्ञानकोशकारच होते. केतकरांचें काम व्यासांच्या परंपरेंतलें होय. केतकरांच्यापूर्वी महाराष्ट्रामध्ये मराठीत ज्ञानकोश काढण्याचा एका दोघांनी यत्न केला पण कोंब फुटतां फुटतांच तो कोळपून गेला. तेलगु, बंगाली, हिंदी, गुजराथी इत्यादि भाषांत मात्र ज्ञानकोश झाले होते किंवा होत होते. केतकर मद्रासकडे १९१५ च्या सुमारास गेले तेव्हा त्यांनी "आंध्रविज्ञानसर्वस्वम्" या नांवाच्या तेलगु ज्ञानकोशाचें काम पाहिलें आणि त्यांना मराठींत ज्ञानकोश रचण्याची स्फूर्ति झाली. तेलगु, बंगाली वगैरे ज्ञानकोशांच्यानंतर मराठी ज्ञानकोशास सुरुवात झाली खरी, पण मराठी ज्ञानकोशाचें काम इतकें चांगलें वठलें, की हिंदुस्थानांतल्या कोणत्याहि भाषेने त्यासाठी मराठीचा मत्सर करावा. शिवाजी महाराजांचा जसा मराठ्यांना अभिमान वाटतो तसा अभिमान "महाराष्ट्रीय ज्ञानकोशाचा"हि वाटला पाहिजे.

दोघांनीहि महाराष्ट्राची कीर्ति दिगन्तांत पसरवली. महाराष्ट्राचा मान होऊन राहिलेल्या ज्ञानकोशाचें कार्य कसें पार पडलें, हें जाणून घेणें प्रत्येक मराठ्याचें कर्तव्य होय. शिवाय, मोठालीं कार्यें कशीं तडीस गेलीं, हें वाचलें की आपणांलाहि एखादें मोठें काम हातीं घेण्यास हुरूप चढतो.

'एन्सायक्लोपीडिया ब्रिटानिका' या नांवाचा इंग्रजी ज्ञानकोश आहे. 'एन्. ब्रिट्.' हें त्याचें संक्षिप्त नांव. तो पूर्वीच तयार झाला होता आणि त्याच्या अद्ययावत् आवृत्त्या मधून मधून निघत असतात. केतकरांनी मराठी ज्ञानकोशाची कल्पना जाहीर केली तेव्हा अनेकांना वाटलें, की हा केतकर काय करणार? – तर एन्. ब्रिट्. चें भाषांतर करून आपल्या हातीं देणार! पण एन्.ब्रिट्. चें भाषांतर करण्यांत आनंद मानण्याइतकी केतकरांची बुद्धि कोती नव्हती. प्रत्येक राष्ट्राला जवळचें वाटणारें ज्ञान भिन्न असतें, हें त्यांना माहीत होतें. तेव्हा जगांतील सर्व ज्ञानापैकी महाराष्ट्राला उपयुक्त असणारें तेवढें ज्ञानच 'महाराष्ट्रीय ज्ञानकोशां'त घ्यावयाचें, हें धोरण त्यांनी आखलें. 'महाराष्ट्रीय' दृष्टिकोनांतून त्यांना ज्ञानाची निवड करावयाची होती. युरोपांतले शेकडो गायक, नर्तक, लेखक आणि इंग्लंडांतील लहानसहान खेडीपाडीं यांची माहिती एन्. ब्रिट्. मध्ये आहे पण तशा माहितीला महाराष्ट्रीय ज्ञानकोशांत त्यांनी वाव दिला नाही. उलट हिंदुस्थानांतील व विशेषतः महाराष्ट्रांतील स्त्रीपुरुष, गावें वगैरेंना त्यांनी महत्त्व दिलें. हिंदुस्थानचा इतिहास आणि वेदांचें संशोधन यांवर त्यांनी शेकडो पृष्ठें खर्च केलीं. ज्ञानकोशाची रचना या 'महाराष्ट्रीय' दृष्टींतून झाल्यामुळे त्याला वैशिष्ट्य आलें. ती ज्ञानाच्या क्षेत्रांत एक स्वतंत्र कारागिरी होऊन बसली.

ज्ञानकोशाचे एकंदर चार खंड असून तेवीस विभाग आहेत. पहिला प्रस्तावना-खंड, त्यांत पांच विभाग आहेत. १ ल्या विभागाचें नांव ' हिंदुस्थान आणि जग '. त्यामध्ये भारतीय संस्कृतीने जगभर केलेल्या दिग्विजयाचें चित्र चितारलें आहे आणि जगांतील संस्कृतींनी हिंदुस्थान-वर घडवलेले परिणाम सांगितले आहेत. शिवाय या प्रचंड घडामोडीं-तून जे समाजशास्त्रीय नियम निघतात त्यांचेंहि विवेचन केलें आहे. ' वेदविद्या ' हा दुसरा विभाग होय. त्यामध्ये चारहि वेदांची व त्यांतून निघणाऱ्या सामाजिक, वाङ्मयीन इतिहासाची अपूर्व माहिती आली आहे. ही माहिती तोंवर महाराष्ट्रांत व कांही अंशीं जगांत अज्ञात होती. पण केतकरांनी अनेक विद्वानांच्या साहाय्याने ती उजेडांत आणली. ' बुद्धपूर्व जग ' व ' बुद्धोत्तर जग ' या तिसऱ्या व चवथ्या विभागांत अतिप्राचीन काळापासून ब्रिटिश राज्याच्या प्रारंभापर्यंतचा जगाचा इति-हास आला आहे. ' विज्ञानेतिहास ' नामक पांचव्या विभागांत व्याकरण, वैद्यक, गणित, पदार्थविज्ञान, भूस्तरशास्त्र वगैरे अनेक विज्ञानांच्या वाढीचा इतिहास वर्णिला आहे. प्रस्तावना-खंडांतील हे पांचहि विभाग म्हणजे ज्ञानकोशरूपी हिमालयाचीं कांचनगंगा, धवलगिरि, गौरीशंकर यांसारखी पांच शिखरें आहेत. तीं ज्ञानकोशांतील ज्ञानाची उंची बोटें उंचावून जणू दाखवीत आहेत! ज्ञानकोशाच्या दुसऱ्या खंडाला ' शरीर-खंड ' असें नांव दिलेलें आहे. त्यांत ६ ते २१ विभाग येतात. अनेक विषयांची माहिती अकारविल्हेने त्यांत दिलेली आढळेल. तिसऱ्या खंडांत २२ वा ' सूचीविभाग ' येतो. पूर्वीच्या २१ विभागांत जे असंख्य विषय आले आहेत त्यांचा पत्ता चटकन् लागावा म्हणून ही ' सूची ' वाटाड्यासारखी उपयोगी पडते. चवथ्या ' पुरवणी ' खंडांतहि एकच

विभाग आहे. त्या २३ व्या विभागाला ' हिंदुस्थान-खंड ' म्हणतात. त्यांत हिंदुस्थानांतील गावें, नगरें, जाति, राज्यव्यवस्था, भौगोलिक परिस्थिति, इतिहास वगैरे हिंदुस्थानची सर्वांगीण माहिती सांगितलेली आहे. शेवटीं या खंडापुरती सूची जोडलेली आहे. ज्ञानकोशाचा प्रत्येक विभाग चांगला जाडाजुडा असून त्यांत मोठ्या आकाराचीं चारशे ते पांचशे पृष्ठें आहेत. सर्व ज्ञानकोशांतील पृष्ठांची संख्या दहा हजारांच्यावरच जाते ! ज्ञानकोश नुसता बघून तुम्ही म्हणाल, " अबब ! केवढा लठ्ठ हा ग्रंथ ! " पण खरेंच, तुम्हीं ज्ञानकोश पाहिला आहे का ? नसेल तर आजच आपल्या शाळेच्या ग्रंथालयांत जाऊन तो पाहा. तो तुम्ही पुन्हा पुन्हा चाळलात, की वर दिलेली माहिती तुम्हांला चांगली समजेल आणि ती तुमच्या मनावर बिंबेल.

केतकरांनी कोणत्या बिकट परिस्थितीत ज्ञानकोशाच्या कामाला प्रारंभ केला ते तुम्हांला माहीत आहे. ज्ञानकोशाकरिता लेखक मिळवितांनाच त्यांना किती अटापिटा करावा लागला ! इतिहासाचार्य राजवाड्यांनी मराठी इतिहासावर १५०० पानें लिहावीं म्हणून त्यांनी ६००० रुपये त्यांना देऊं केले, पण राजवाडे प्रथम कबूल होऊन मागाहून अंग झटकून दूर झाले. वासुदेवशास्त्री खरे राजवाड्यांसारखे इतिहासावरचे अधिकारी लेखक होते. पण त्यानींहि केतकरांना नकार दिला. त्यांचें पैशामध्ये व इतर कारणांनी जमलें नाही. लोकमान्य टिळक वेदांवर लेख लिहिणार होते पण राजकारणाच्या रामरगाड्यांत त्यांना फावलें नाही आणि पुढे मृत्यूनेच त्यांच्यावर झडप घातली. डॉक्टर भांडारकरांनी लेख तपासून देण्याचें कबूल केलें होतें पण म्हातारपणामुळे पुढे, काम करण्यास ते असमर्थ झाले. अशा रीतीने, कांही ना

कांहीं कारण घडून प्रथितयश विद्वानांच्या साहाय्याची सर्व आशा दुरावली. पण केतकर असे खंबीर, की ते मुळीच डगमगले नाहीत. त्यांनी नवखे पदवीधर हाताशीं धरले आणि फुंक मारून त्याच्यांतून विद्वान् तयार केले ! इंग्रजी पदवीधर आणि जुनीं शास्त्रें पढलेले शास्त्री यांच्या मदतीवर ज्ञानकोश तयार झाला. संपादक मिळवतांना जो त्रास झाला तोच माहिती मिळवतांनाहि झाला. ' महाराष्ट्रीय ' ज्ञानकोशांत मराठींतील सर्व निवडक ज्ञान द्यावें, ही अपेक्षा साहजिक होती. पण मराठींतलें ज्ञान निवडणार कसें ? मराठींत तोंवर किती पुस्तकें प्रसिद्ध झालीं याचा कोणाला पत्ताच नव्हता ! तेव्हा सर्व मराठी पुस्तकांची यादी किंवा सूचि प्रथम करावी लागली आणि मग त्या पुस्तकांतलें ज्ञान निवडणें शक्य झालें. ज्ञानाचा मुख्य साठा इंग्रजींत होता; तेव्हा मुक्त हस्ताने इंग्रजीमधून मराठींत ज्ञानाची आवक करण्यांत आली. पण कांही ज्ञान इंग्रजीबाहेरोहि होतें व तें हिंदुस्थानला आणि महाराष्ट्राला जवळचें असल्यामुळे मराठींत आणणें जरूर होतें. तेव्हा जर्मन, डच, फ्रेंच इत्यादि भाषांतील ग्रंथांचीं भाषांतरें प्रथम इंग्रजींत करून नंतर त्यांचा मथितार्थ मराठींत घेण्यांत आला ! हिंदुस्थानांत होणाऱ्या कोणत्याहि ज्ञानकोशांत वेदविषयक मजकूर उत्कृष्ट असावा, असें कोणालाहि वाटणारच. पण वेदांवर लिहितांना असें आढळून आलें, की तोंवर झालेलें वेदविषयक वाङ्मय अचूक किंवा परिपूर्ण नव्हतें. तेव्हा अनेक विद्वानांना हाताशीं धरून, त्यांना संशोधनपद्धतीचे धडे देऊन केतकरांनी वेदांचा अभ्यास केला. जातींची माहिती वगैरे ज्ञान पुस्तकांत मिळण्यासारखें नव्हतें; तें त्यांनी समाजांतून प्रत्यक्षच गोळा केलें. थोडक्यांत म्हणजे ज्ञानकोशाच्या संसारांत त्यांना शेंडीपासून तयारी

करावी लागली व ती त्यांनी चिकाटीने, न कच खाता केलीहि !

ज्ञानकोशांत काम करणारे लेखक फुकट कामें करीत नव्हते; कारण उपाशी राहून कोणीच काम करूं शकत नाही आणि 'कोणाकडून फुकट काम घेणार नाही' असा केतकरांचा बाणा होता. तेव्हा लेखकांच्या पगारासाठी केतकरांना पैसा उभा करावा लागत होता. शिवाय छपाई, कागद वगैरेसाठीहि शेकडो रुपये खर्ची पडत होते. हे पैसे जमवतांना केतकरांची कल्पकता आणि उद्योगशीलता चांगलीचं दिसून आली. ज्ञानकोशासाठी "लिमिटेड कंपनी" काढावयाचें ठरवून त्यांनीं लोकांना आश्चर्याचा पहिला धक्का दिला. तोंवर व्यापारासाठी किंवा कारखान्यासाठी लिमिटेड कंपनी काढून लोकांना ठाऊक होती; पण वाङ्मयासाठी कंपनी काढणें सर्वांना चक्रमपणाचें वाटत होतें. राजेरजवाड्यांनी, सरदारजहागीरदारांनी उदार देणग्या द्याव्या व विद्येचीं कामें व्हावीं, अशी प्रथा होती. कंपनी आली म्हणजे शेअर आले, निवडणूक आली, मतें आलीं, कायद्याचें नियंत्रण आलें; मग लोक शेअर कसचे घेणार, पैसा कसचा जमणार आणि काम तरी कोठून होणार ?— असें शहाण्यासुरत्या लोकांनासुद्धा वाटलें. पण केतकरांनी कंपनी काढली आणि त्यांचेंच म्हणणें खरें ठरलें. एक लाख रुपये भांडवल जमा झालें ! सुमारें चार लाख रुपयांची उलाढाल झाली ! संस्थानिकांनी नव्हे तर मुख्यतः सामान्य लोकांनीच हा पैसा दिला ! आणि अविश्रांत श्रम करून केतकरांनी आपली कल्पना यशस्वी करून दाखविली. केतकरांच्या उदाहरणामुळे मोठमोठ्या वाङ्मयीन कामांसाठी 'कंपनी' काढण्याची प्रथा पुढे महाराष्ट्रांत चालू झाली.

ज्ञानकोशाला लागणारा पैसा 'शेअर' मधून निर्माण झाला आणि

पुस्तकांच्या विक्रींतून उत्पन्न झाला. कलकत्त्यापासून गोव्यापर्यंतचा शेकडो मैलांचा प्रवास केतकरांनी पुस्तकविक्रीसाठी केला. ज्ञानकोशास गिऱ्हाईक मिळविण्यासाठी ते दहा दहा, चौदा चौदा तास रोज राबत असत. ते फार कुशल प्रचारक होते. अगदी सामान्य लोकांना ते ज्ञानकोशाचें महत्त्व पटवून देत आणि १०० ते १५० रुपयांचा तो ग्रंथ त्यांना घ्यायला लावीत. ते पुस्तकें खपविण्यांत इतके वाकबगार होते, की एका उपाहारगृहाच्या मालकाला व एका वॉशिंग कंपनीच्या मुसलमान चालकाला त्यांनी ज्ञानकोशाचे ग्राहक बनविलें होतें ! एका न्हाव्यालादेखील त्यानी ज्ञानकोश घेण्यास लावलें होतें ! ज्ञानकोश एकूण तीन हजार खपले; त्यांपैकीं दीड ते दोन हजार एकट्या केतकरांनी खपविले ! केतकर म्हणजे जगद्विख्यात महापंडित, पण ज्ञानकोशाचे गठ्ठे खाकेंत मारून ते दारोदार विकतांना त्यांना कमीपणा वाटला नाही. त्यांच्या शिकवणीमुळे ज्ञानकोशांतले अनेक संपादक, पुस्तकांचा प्रचार स्वतः हिंडून करूं लागले.

केतकरांनी एक लाखाचे शेअर खपविले, तीन हजार पुस्तकें विकलीं पण पैशाचा प्रश्न तरीहि त्यांना फारच जाचला. विशेषतः छापखानदारांनी त्यांना पेचांत टाकलें. महाराष्ट्रांतल्या जुन्या व मोठ्या छापखान्यांत केतकरांनी पुस्तके छापण्यास दिलीं; पण त्यांचें काम कोणीहि सचोटीने केलें नाही. छापखानदार छपाईस अक्षम्य दिरंगाई करीत. एकेका दिवसाच्या दिरंगाईने केतकरांना सुमारें दीडशे रुपये बूड येई ! कारण त्या वेळांत, संपादनखात्यांतल्या संपादकांना व इतर नोकरांना पगार द्यावाच लागे. छापखानदारांच्या निष्काळजीपणामुळे सुमारें पंचाहत्तर हजार रुपये केतकरांचे बुडाले ! शेवटीं, त्यांनी स्वतःचाच

छापखाना उभा केला, खिशांत केवळ शंभर रुपये असतांना धाडसानें चार हजार रुपयांचे यंत्र मागविलें आणि या पेचातून मार्ग काढला. केतकरांच्या जागीं लेचापेचा मनुष्य असता तर तो हबकूनच गेला असता. छापखानदारांप्रमाणे ज्ञानकोश–कंपनीच्या चालकांशींहि केतकरांना झगडावें लागले. कांही चालक आपला स्वार्थ पाहात होते, केतकरांना मुठींत ठेवण्याची त्यांची इच्छा होती पण केतकरांनी त्यांना नाना खटपटी करून चालकमंडळांतून हुसकून दिले. केतकर खूप काम करीत, त्यांच्या इतका योग्य दुसरा मनुष्य मिळणें शक्य नव्हतें आणि त्यांना कंपनीच्या कायद्याचें काटेकोर ज्ञान होतें म्हणूनच ते या कामांत यशस्वी झाले. दिल्लीवर धडक देणाऱ्या बाजीरावाचें रक्त गृहकलहानें जितकें खाल्लें तितकेंच केतकरांचे खाल्लें. पण केतकर बाजीरावासारखे वीर पुरुष म्हणून डरले नाहीत.

ज्ञानकोशाचे काम म्हणजे ज्ञान एकत्र करण्याचें सोवळें काम. त्यांत भाडणतंटे, चळवळी, कोर्टदरबार होण्याचें कांही कारण नाही. पण महाराष्ट्रीय ज्ञानकोशाच्या वेळीं जवळ जवळ हे सर्व प्रकार झाले. ज्ञानकोशाच्या चवथ्या विभागांत महंमदाचें चरित्र प्रसिद्ध झालें; तें मुसलमानांना आवडलें नाही. त्यामुळे मुसलमानांनी मोठी चळवळ केली. सभा झाल्या, ठराव झाले, सरकारकडे अर्ज गेले आणि केतकरांकडे शिष्टमंडळे आलीं. निजामच्या राज्यांत ज्ञानकोशाला बंदी करणारे फर्मान निघाले व कांही माथेफिरूंनी केतकरांना खुनाच्या धमक्या दिल्या ! केतकरांनी मुसलमानांना परोपरीनें समजावून सांगितलें; पुरवणीमध्ये दुसरी बाजू मांडण्याचें कबूल केलें पण जमलें नाही. अखेर अज्ञानापुढे व आग्रहापुढे हात टेकून त्यांना महंमदाच्या चरित्राचीं पानें कापावीं

लागलीं ! देवरुखे, गोवर्धन वगैरे जातींनीहि ज्ञानकोशाविरुद्ध काहूर माजवलें. कारण त्यांना स्वतःविषयी ज्ञानकोशांत आलेला मजकूर मान्य नव्हता. त्या सर्वांना केतकरांनी शांतपणें उत्तरें दिलीं पण त्यांचें समाधान झालें नाही. कालांतराने त्यांच्या चळवळी थंडावल्या आणि तो प्रश्न मागे पडला. केतकरांच्या धैर्याला मात्र येथे चांगलाच कस लागला व तें बावन्नकशी ठरलें.

जे पुरुष मोठालीं कामें तडीस नेतात त्यांच्या अंगीं अनेक गुण एकवटलेले असतात. एखाद्या गुणाने मोठीं कामें होत नाहीत. शिवाजी महाराज जसे शूर होते तसेच मुत्सद्दीहि होते म्हणून ते हिंदवी राज्य स्थापूं शकले. लो. टिळक जसे धैर्यमेरु होते तसेच संघटक व विद्वान् होते म्हणून ते इंग्रजी राज्याला धक्का देऊं शकले. महात्मा गांधी जसे राजकारणी होते तसेच साधु पुरुष होते म्हणून ते स्वातंत्र्य मिळवूं शकले. महिला विद्यापीठ स्थापणारे महर्षि आण्णासाहेब कर्वे यांच्यामध्ये पराकोटीची चिकाटी आहे व शुद्ध चारित्र्य आहे म्हणून ते यशस्वी झाले. केतकर नुसते विद्वान् असते तर त्यांनी चार पुस्तकें लिहिलीं असतीं; पण त्यांच्या हातून ज्ञानकोश झाला नसता. चिकाटी, धैर्य, सततोद्योग, संघटनकौशल्य, धाडस वगैरे अनेक गुणांची जोड त्यांच्या विद्वत्तेला मिळाली होती; म्हणूनच ज्यांचें नांव मराठी भाषा जिवंत असेतोंवर तेजाने तळपत राहावें असें काम ते करूं शकले.

ज्ञानकोशाचें मोठेंपण अनेक प्रकारचें आहे. ज्ञानकोशाने वेचक ज्ञान एकत्र केलें. अशा वेचलेल्या व एकत्र केलेल्या ज्ञानाचा उपयोग फार होतो. समजा, मला मराठी काव्याचा अभ्यास करावयाचा आहे; पण केवळ मराठी काव्य वाचून माझें भागेल का ? संस्कृत काव्याचा

मराठी काव्यावर परिणाम झालेला आहे. पंडित कवींनी संस्कृत कवितेवरून मराठी कविता लिहिली, हें तुम्हांला माहीत आहे. मग मला मराठी कवितेच्या अभ्यासासाठी संस्कृत कविता समजली पाहिजे. पण संस्कृत कविता वाचण्याइतका वेळ माझ्यापाशी नसतो. मग मीं काय काय बरे करावें? ज्ञानकोशात तज्ज्ञ माणसाने लिहिलेला संस्कृत काव्यावरील लेख वाचून अशा वेळीं, मी पुढे जाऊं शकतों. अभ्यासकाला ज्ञानकोश असा उपयोगी पडतो. ज्याला त्याला आपापल्या शंका आणि जिज्ञासा ज्ञानकोशावरून फेडून घेतां येतात तें वेगळे. समजा, तुम्ही दिल्लीला जावयास निघालांत व तेथील ऐतिहासिक स्थळें पाहाण्याची तुमची इच्छा आहे. पण ऐतिहासिक स्थळें कोणतीं आहेत, हें कळल्याशिवाय तीं पाहातां येतील का? ज्ञानकोश उघडून दिल्लीवरील लेख तुम्हीं काढलांत, की त्यावरून तुम्हांस हीं ऐतिहासिक स्थळें कळूं शकतील. ज्ञानकोशाने आपल्या मराठींतल्या ज्ञानाचा खजिना खूपच वाढवला आहे. अनेक लेखक महाराष्ट्रीय होते पण त्यांचे लेखन झालें इंग्लिशमध्ये. अशांचें इंग्रजी लेखन भाषांतरून व संक्षिप्त करून ज्ञानकोशाने मराठींत आणलें. कांही लेखक होते इंग्रज, डच, जर्मन किंवा अमेरिकन; पण त्यांनी आपापल्या भाषांत हिंदुस्थानबद्दल किंवा महाराष्ट्राबद्दल लिहिलें होतें. अशांचें लेखन भारतीय किंवा महाराष्ट्रीय महामाणसाच्या दृष्टीने महत्त्वाचें होय. ज्ञानकोशाने म्हणूनच तें मराठींत आणलें. हें झालें संग्रहाचें काम, त्याशिवाय नवीन संशोधनाचें व ज्ञानदानाचें कामहि ज्ञानकोशाने खूप केलें. आपल्या वेदांबद्दल हिंदी लेखकांनी फार थोडें लिहिलें, पण पाश्चात्य पंडितांनी त्यांवर अपार लेखन केलें. ते लेखन एकांगी, अपुरें आहे; त्यांत खूप भर घालता येईल, असें

केतकरांना प्रथमदर्शनींच वाटलें. पाश्चात्य पंडितांचा अभ्यास खूप, पण येथल्या स्थितीचें त्यांचें ज्ञान अपूर्ण; म्हणून त्यांच्या लिहिण्यात उणीवा राहून गेल्या होत्या. तेव्हा प्रत्यक्ष यज्ञ केलेले, जुनीं शास्त्रे पढलेले पंडित मदतीस घेऊन केतकरांनी वेदांचा अभ्यास केला. या अभ्यासावरून वेदांबद्दल व वेदकालीन इतिहासाबद्दल खूप नवी माहिती त्यांनी उजेडांत आणली. या माहितीचा सारांश जगांतल्या बहुतेक विद्यापीठांकडे त्यांनी पाठविला आणि अनेक विद्यापीठांनी ' महाराष्ट्रीय ज्ञानकोश ' नंतर विकत घेतला ! इंग्लंड, स्वीडन, जर्मनी, चेकोस्लोव्हाकिया, फ्रेंच इंडोचायना, अमेरिका इत्यादि राष्ट्रांत मराठी विद्वत्तेची थोरवी सांगत आज ' महाराष्ट्रीय ज्ञानकोश ' बसला आहे ! केतकरांचा समाजशास्त्राचा अभ्यास दांडगा होता; तेव्हा ज्ञानकोशांत जागजागीं त्यांनी आपले समाजशास्त्रीय विचार मांडले आहेत. महाराष्ट्रांत किंवा हिंदुस्थानांत समाजशास्त्राचा अभ्याम अजून जोरावला नसल्यामुळे या विचारांची किंमत कळलेली नाही. पण केतकरांना वाटे, की ज्यावर लोक मोठमोठाले ग्रंथ पुढे लिहितील असे सिद्धान्त आपण एकेका पानांत सांगितलेले आहेत ! सारांश ज्ञानकोशाचें महत्त्व अनेक प्रकारचें आहे आणि त्याचा उपयोग फार मोठा आहे.

ज्ञानकोश पूर्ण झाला तरी आपल्या लिहिण्याची परीक्षा करणारे पंडित महाराष्ट्रांत नाहीत म्हणून केतकरांना वाईट वाटे. आपल्या ज्ञानकोशाचा भरपूर उपयोग लोकांनी करावा, अशीहि त्यांची इच्छा होती. तुम्ही यापुढे, ज्ञानकोश किंवा त्याच्यासारखे इतर कोश याचा नेहमी उपयोग करीत जा, म्हणजे केतकरांची ती इच्छा पूर्ण होईल. —आणि केतकरांच्या लिहिण्याची परीक्षा करण्याची आकांक्षाहि तुम्ही

अवश्य बाळगा. तुमच्यासारख्या विद्यार्थ्यांतूनच केतकर झाले; मग तुमच्यांतून केतकरांची परीक्षा घेणारा कोणी होणार नाहीं, असें कसें म्हणावें? 'Not failure but low aim is crime' हें तुम्ही लक्षांत ठेवा, आणि असली उंच आकांक्षा बाळगतांना एवढेदेखील डरूं नका.

### अभ्यास

१ ज्ञानकोशाची रचना 'महाराष्ट्रीय' दृष्टिकोनातून केली, म्हणजे काय केलें?

२ ज्ञानकोशाच्या कामात आलेल्या अडचणीचा निर्देश करा व त्यापैकी एका अडचणीचें निराकरण केतकरानी कसे केले, ते सागा.

३ ज्ञानकोशाची थोरवी वर्णन करणारें गद्यकाव्य लिहा किंवा ज्ञानकोशावर एक स्तोत्र रचण्याचा प्रयत्न करा.

४ विद्वत्तेच्या जोडीला कोणते गुण होते म्हणून केतकर यशस्वी झाले?

## ४. वाङ्मय

योद्धयांच्या चरित्रांत लढायांची वर्णनें येतात. तीं सर्वांनाच आवड-तात. राष्ट्रीय पुढाऱ्याच्या चरित्रांत बंदिवास व संकटें यांचा वृत्तांत येतो. तोहि आपलें मन वेधून घेतो. पण विद्वानांच्या चरित्रांत लढा-यांचीं वर्णनें कोठून येणार ? बंदिवास किंवा संकटें यांचा वृत्तांत तरी कसा संभवणार ? विद्वान् लढाया खेळत नाहीत कीं बंदिवासांत पड-ण्याचा, नाना संकटे सोसण्याचा प्रसंग त्यांच्यावर सहसा येत नाही. ते लिहितात पुस्तकें; त्यांच्या चरित्रांत पुस्तकांचीं वर्णनेंच वाचावीं लागतात. — आणि पुस्तकांचीं वर्णनें तितकीं आकर्षक नसतात. पण पुस्तकांचीं वर्णनें आकर्षक नसलीं तरी महत्त्वाची असतात. एकेक पुस्तक अकल्पनीय उलथा-पालथी घडवून आणते. फ्रान्समध्ये रूसो व व्हॉल्टेअर यांच्या पुस्तकांनी फ्रेंच राज्यक्रांति पेटवली. लो. टिळकांच्या गीतारहस्याने अनेक लोकांच्या जीवनाला दिशा मिळाली. सावरकरांच्या मॅझिनीने फासावर हसत चढणारे तरुण निर्माण केले. मोठ्या पुस्तकांचा प्रभाव असा मोठा असतो. यासाठी पुस्तकांचीं वर्णनें

आकर्षक नसलीं तरी तीं वाचलीं पाहिजेत. केतकर विद्वान् होते म्हणून त्यांच्या चरित्रांत आपणांला आता पुस्तकांचींच वर्णनें वाचावीं लागतील. केतकरांचीं पुस्तकें म्हणजे आपल्या महाराष्ट्राचें धन आहे. त्या धनाच्या भांडवलावर पुढे मोठा राष्ट्रीय व्यापार थाटला जाणार आहे ! त्यांच्या पुस्तकांतले विषय अनेकांना मार्गदर्शक होणार आहेत. तेव्हा त्यांच्या पुस्तकांची ओळख करून घेणें, हें प्रत्येक विद्याप्रेमी माणसाचें कर्तव्य होय.

केतकरांनी मराठींत आणि इंग्रजींत दोन्ही भाषांत लिखाण लिहिलें. त्यांनी जन्मभर लेखनाचाच उद्योग केला. पोटासाठी भलताच उद्योग करावा आणि फावल्या वेळांत लिहावें असा प्रकार त्यांच्या बाबतींत नव्हता. लेखनावरच त्यांची उपजीविका चाले. ज्ञानकोशाचे वेळीं त्यांना प्रकाशन, मुद्रण, विक्री, पैसा गोळा करणें वगैरे बरेच उद्योग करावे लागले; पण हे सर्व उद्योग वाङ्मयाशीं संबद्ध होते. म्हणजे लेखन हाच केतकरांचा प्रमुख व्यवसाय होता. त्यांना लेखनाची हौसहि तशीच दांडगी असे. ते आगगाडींत लिहीत, ट्रॅममध्ये लिहीत, झोपेंतून उठून लिहीत हें तर खरेंच; पण ते विश्रांति घेण्यासाठीहि लिहीतच ! गंभीर, शास्त्रीय ग्रंथ लिहितांना आलेला शीण घालविण्या-साठी ते काव्य किंवा कादंबरी लिहीत. म्हणजे एका वेळीं त्याचें दोन प्रकारचें लिहिणें चालू असावयाचें. एक लिहिणें गंभीर असे तर दुसरें करमणुकीचें असे. अशा प्रकारें ‘ प्राचीन महाराष्ट्रा ’चा प्रचंड इतिहास लिहितां लिहितां त्यांनी ‘ गावसासू ’ व ‘ ब्राह्मणकन्या ’ या कादंबऱ्या हातावेगळ्या केल्या ! लेखनाची त्यांची गति फार जलद असे. ज्ञानकोशांतून थोडी सवड मिळतांच त्यांनी इतकें लिहिलें की

त्यांच्या लिहिण्यावर अभिप्राय लिहितां लिहितां कांही टीकाकारांची तिरपीट उडून गेली ! त्यांच्या लिहिण्याचा आढावा घेतला तर असें दिसतें, की त्यांचे एकूण लहानमोठे दहाअकरा ग्रंथ आहेत; सात कादंबऱ्या आहेत, थोडीशी स्फुट कविता आहे, एक अपूर्ण नाटक आहे आणि सुमारे चारपांचशे स्फुट लेख आहेत ! संपादित केलेले किंवा पत्र-कांच्या स्वरूपाचे त्याचे वाङ्मय आहे ते वेगळेच. शिवाय ज्ञानकोशा-मध्ये त्यांच्या नेतृत्वाखाली सुमारें दहा हजार पृष्ठांचें वाङ्मय उत्पन्न झालें ते यांत धरलेलें नाही. त्याचें कांही वाङ्मय अजून अप्रसिद्धीच्या अंधारांतच पिचत पडलेले आहे. हे सर्व वाङ्मय एकदम दृष्टीसमोर आणले, की केतकराची लेखणी किती बहुप्रसु होती, हे स्पष्ट होते. महाराष्ट्रांत न. चि. केळकरांसारखे खूप लिहिणारे जे लेखक आहेत त्यांच्यामध्ये केतकरांची गणना नक्की करावी लागेल. ते खंदे लेखक होते, यांत संशय नाही.

दुर्दैवाने त्यांचे समग्र वाङ्मय आज एका ठिकाणीं मात्र मिळूं शकत नाही. केळकरांचे सर्व वांङ्मय ‘ समग्र केळकर ’ या नांवाने प्रसिद्ध झालें, तसें केतकरांचे झालें नाही. उलट केतकरांचे वाङ्मय नाना ठिकाणी विखुरलें गेलें. त्यांचें एक पुस्तक अमेरिकेत प्रसिद्ध झालें, एक इंग्लंडमध्ये प्रसिद्ध झालें, दोन कलकत्याला प्रसिद्ध झालीं आणि बाकीचीं महाराष्ट्रांत प्रसिद्ध झालीं ! त्यांचे कित्येक लेख जुन्या मासि-कांच्या व वृत्तपत्रांच्या ढिगाऱ्यांत विखुरलेले आहेत. कांही लेख तर मद्रासच्या एका मासिकांत आले होते आणि त्या मासिकाचे अंक मिळणें आज दुरापास्त झालें आहे. मासिकांतले कांही लेख आज नामशेष झाले आहेत किंवा नांवासकट नष्ट तरी झाले आहेत. त्यांचीं कांही पुस्तकेंहि

हल्ली बाजारांत मिळत नाहीत. पाश्चात्य देशांत थोर लेखकांचे वाङ्मय किती काळजीपूर्वक जतन करून ठेवतात. पण आपण असे करंटे, की आपल्या वाङ्मयधनाची आपणांला किमत नाही. श्रीमंताच्या उधळ्या व नादान मुलाप्रमाणे आपण ते उधळून मातीत घालवितो. केतकरांचे सर्व लेख व ग्रंथ जेव्हा पुन्हा छापले जातील तेव्हा सोन्याचा दिवस उगवला, असें म्हणावे लागेल.

केतकरांचे वाङ्मय जसे विपुल आहे तसेच तें विविध आहे. त्यांनी अनेक शास्त्रांचा अभ्यास केलेला होता, त्यामुळे अनेक विषयांत त्यांचे डोके चाले. त्यांनी समाजशास्त्रावर खूपच लिहिलें आहे. समाजशास्त्रावर त्यांचीं तीन पुस्तके आहेत. एक पुस्तक त्यानी अर्थशास्त्रावर लिहिलें आहे. त्यांचे एक पुस्तक कायद्यावर आहे. दोन पुस्तके राजकारणावर आहेत, एक पुस्तक साहित्यशास्त्रावर आहे आणि इतिहासावर त्रिखंडात्मक एक प्रचंड ग्रंथच आहे ! वेदांवर त्यांनी ज्ञानकोशाचे जे दोन खंड रचले तेहि येथे सांगितले पाहिजेत. कौतुकाची गोष्ट अशी, की इतके शास्त्रीय ग्रंथ लिहून, त्यांनी ललित वाङ्मयदेखील लिहिलें. शास्त्रीय ग्रंथांमुळे त्यांची गणना रानडे, भांडारकर, टिळक, राजवाडे या गाढ्या पंडितांत होऊं लागली. ज्या पंडितात त्यांची गणना झाली त्या पंडितांपैकी एकानेहि ललित वाङ्मय लिहिलें नाही. पण केतकरांनी ते लिहिलें आणि कादंबरीवाङ्मयांत आपले नांव आपल्या वैशिष्ट्याने चिरंजीव करून ठेवले. त्यांनी एक अपूर्ण नाटकाहि लिहिले आणि त्यांच्या कांही स्फुट कवितादेखील प्रसिद्ध झाल्या. आयुष्याच्या शेवटीं एक महाकाव्य लिहिण्याचा त्यांचा विचार होता; पण तो तडीस गेला नाही. त्यांच्या वाङ्मयांतील विविधता आश्चर्यजनक आहे.

वैपुल्य आणि विविधता हे गुण महत्त्वाचे आहेत, पण कोणचेंहि वाङ्मय एवढ्या दोनच गुणांनी उच्च ठरूं शकत नाही. वाङ्मयाची उच्चता त्यामधील विचारांच्या उंचीवर व नवीनपणावर अवलंबून असते. या दृष्टीने केतकरांचें सर्व शास्त्रीय वाङ्मय उच्च दर्जाचें आहे. समाजशास्त्रावरील आपल्या ग्रंथांत त्यांनी मुख्यतः हिंदु समाजाचा विचार केला. हिंदु समाजाची बांधणी कशी आहे, तो ख्रिश्चन किंवा मुसलमान समाजांपेक्षा वेगळा कसा आहे, आजपर्यंत त्याचा विकास कसकसा झाला, त्याने भविष्यकाळांत जुनें काय टिकवावें व नवें काय घ्यावें, याचें विवेचन त्यांनी केलें. असे स्पष्ट व शास्त्रीय विवेचन दुसऱ्या कोणाहि मराठी लेखकाने केलेलें नाही. जगांतील मनुष्यसमूहांच्या विकासाचे नियमहि शोधून केतकरांनी मांडले आहेत. हिंदुस्थानांतल्या सुमारें तीन हजार जातींचा त्यांनी खूप अभ्यास केला होता. समाजशास्त्रावरील या त्यांच्या लिखाणाचा दर्जा इतका मोठा आहे, की परीक्षेसाठी त्यांनी लिहिलेल्या पहिल्याच पुस्तकाने युरोप-अमेरिकेंतल्या पांचसात विद्यापीठांत टीकेची खळबळ उडाली होती. पालीच्या व संस्कृतच्या जगद्विख्यात पंडितांनी त्यांच्या पुस्तकावर अभिप्राय लिहिले आणि फ्रेंचमध्ये एक परामर्श घेणारी टीका प्रसिद्ध झाली ! अर्थशास्त्रावरील त्यांचें पुस्तक छोटें पण मार्मिक आहे. त्या पुस्तकांत त्यांनी सामाजिक घडामोडींचा आर्थिक घडामोडींशीं असणारा निकट संबंध दाखविला आहे. म्हणजे पडद्याच्या पद्धतीचा परिणाम कारखान्यांवर कसा होतो, जातींचा परिणाम उद्योगधंद्यांवर कसा होतो वगैरे गोष्टी स्पष्ट केल्या आहेत. साहित्यशास्त्रावरील आपल्या पुस्तकांत त्यांनी जुन्या मराठींत काव्यपरीक्षण कसें होई, तें सांगितलें. काव्यपरीक्षणावर पूर्वी पुस्तकें

होत नसत; अशा स्थितींत लोकांनी केलेलें काव्यपरीक्षण कसें हुड-कावें, त्याच्या रीति या पुस्तकांत सांगितल्या आहेत. हल्ली हें पुस्तक बी. ए. ला नेमलेलें असतें. राजकारणावरील एका पुस्तकांत त्यांचा द्रष्टेपणा उघड दिसतो. इंग्रज लोक आपल्याच स्वार्थासाठी हिंदुस्था-नला स्वातंत्र्य देतील, असें भविष्य तेथे त्यांनी वर्तविलें आहे ! हिंदु-स्थानला स्वातंत्र्य देण्यांत इंग्लंडचा फायदा आहे, असा विचित्र वाटणारा सिद्धान्त सांगून तो त्यांनी त्या पुस्तकांत पटवून दिला आहे. आज त्या सिद्धांताची प्रचीति आपणांला येत नाही का ? ' प्राचीन महाराष्ट्र ' या इतिहासांत त्यांनी ताम्रपट, शिलालेख, अवशेष, कथा-वाङ्मय इत्यादि अफाट साहित्यावरून शातवाहनांच्या काळचा वृत्तांत दिला आहे. हा वृत्तांत देतांना त्यांनी कल्पना सपाटून लढवली; त्यामुळे तो खोटा म्हणावा तरी पंचाईत होते आणि खरा म्हणावा तरीहि पंचाईत होते. कारण दोन्ही ठिकाणीं पुरावा अपुरा पडतो व केतकरांच्या कल्पनेला काय म्हणावे तें कळत नाही. मिळून केतक-रानी टीकाकारांना बुचकळ्यात टाकलें आहे. असो. येथवर केलेल्या वर्णनावरून, आकाशाप्रमाणे उंच व अफाट अशा केतकरांच्या विचा-रांची थोडीशी कल्पना तुम्हांला येऊं शकेल.

केतकरांचे विचार उंच व अफाट खरे, पण ते अनेक वेळा विक्षिप्त, विचित्र किंवा चक्रमपणाचे भासतात आणि क्वचित् तसे असतातहि. त्यांचे जे विचार अनेकांना मुलखावेगळे वाटले त्यांचे कांही नमुने पाहाण्यासारखे आहेत. सर्व मराठी काव्य जळून खाक झालें तरी वाङ्म-याच्या दृष्टीने जगाचें कांही नुकसान होणार नाही, असा शेरा त्यांनी मराठी काव्यावर ज्ञानकोशामध्ये मारला ! गीता हा सैतानी ग्रंथ आहे,

आपल्या आयुष्याला दिशा दाखवण्याची त्याची आज योग्यता नाही, अशा अर्थाचे उद्गार एका कादंबरींत एका संन्याशाच्या तोंडीं त्यांनी घातले ! मलबारमध्ये कुटुंबांत स्त्रिया प्रमुख असतात; तसली स्त्रीसत्ताक कुटुंबपद्धति पुन्हा कोठे सुरू करावी, असें त्यांचे मत होतें. बुवाबाजी आणि गुरुबाजी समाजाला उपयोगी आहे, सबब ती नष्ट करूं नये, तींत अधिक कला आणावी, असें एका कादंबरीत त्यांनी म्हणणें मांडले ! हिंदुस्थान देश सार्वभौम व स्वतंत्र आहे, त्यावरील ब्रिटिश पार्लमेंटची सत्ता बेकायदेशीर असून ती कोर्टात फिर्याद केल्याने नष्ट होईल, असा त्यांचा पक्का विश्वास होता ! इंग्रज व्हाईसरॉयने पगडी, बाराबंदीचा अंगरखा, किंवा शेरवानी यासारखा हिंदी पोषाख करावा म्हणून त्यांनी सूचना केली होती ! ते म्हणत, की बादशहाकडे अर्ज करून त्याने ब्राह्मणांकडून मुंज करवून घ्यावी, हिंदु संस्कार करवून घ्यावे, अशी विनंती करण्याचा आपणांस हक्क आहे ! – अशीं त्यांचीं विक्षिप्त ठरलेलीं मतें किती तरी सांगतां येतील. तीं वरकरणीं मूर्खपणाचीं किंवा आचरटपणाचीं दिसतात, पण त्यांत पूर्ण सत्य नसलें तरी खूप अर्थ होता, त्यांच्यामागे फार मोठा विचार होता. केतकरांचें वाङ्मय प्रत्यक्ष वाचल्याशिवाय त्यांच्यामधलें रहस्य कळणार नाही. थोडक्यांत म्हणजे उंच, अफाट, मुलखावेगळ्या विचारांनी केतकरांचे वाङ्मय भरलेलें आहे आणि म्हणूनच ते उच्च आहे. तें वाचकाला पानोपानीं विचारांचे धक्के देतें. तें झोपलेल्याला जागें करील, सुस्त डोक्यांत विचारांची वादळें उत्पन्न करील आणि आकसलेल्या, खुरटलेल्या, संकुचित माणसांना भव्य बनवील.

येथवर सांगितलें, की केतकरांचे लिहिणें विपुल, विविध आणि

विचारप्रवर्तक होते, पण तेवढे सांगितल्याने त्यांच्या लिहिण्याचें पूर्ण वर्णन होत नाही. ते लिहिणें मार्गदर्शक होते, हा त्याचा असाधारण गुण होय. केतकरांनी देशभक्तासारखा पोषाख कधी केला नाही, ते तुरुंगांत कधी गेले नाहीत, पण ते रोमरोमांत देशभक्त होते. आपल्या देशाच्या प्रगतीचा विचार अहर्निश त्यांच्या मनांत घोळत असे. त्यामुळे त्यांनी देशाचे भले कसे होईल, हेच सर्वत्र सांगितले आहे. हजारो वर्षांचा आणि अनेक देशांचा इतिहास त्यांना तळहातावरील आवळ्या-इतका स्पष्ट दिसे. अनेक समाज त्यांनी बारकाव्याने पाहिले होते, समाजांत उलथापालथी कशा होतात, याचा शास्त्रीय अभ्यास त्यांनी केला होता, त्यामुळे आपल्या राष्ट्राच्या उणीवा त्यांना चटकन समजत. त्यांवरील उपाय ते सहज सांगूं शकत. अर्थात् त्यांचे लिहिणे म्हणजे दशग्रंथी ब्राह्मणाची पोपटपंची झाली नसून द्रष्ट्या गुरूचा मार्गदर्शक उपदेश झाला आहे. त्यांतील ग्राह्याग्राह्य भाग निवडल्यास ते विधा-यक आहे. ज्यांना आपल्या समाजाचे कोणतेहि काम करावयाची इच्छा असेल त्यांनी आधी ‘ केतकर ’ वाचावे, त्यांना कांहीतरी नवा प्रकाश मिळाल्याखेरीज राहाणार नाही. कांहीजण लहान विद्यार्थ्यांचे गुरु असतात, त्यांना आपण ‘ मास्तर ’ म्हणतो. कांहीजण समाजाचे गुरु असतात; त्याना आपण व्याख्याते किंवा पुढारी म्हणतो. पण केतकर ‘ मास्तरांचे ’, व्याख्यात्यांचे व पुढाऱ्यांचे गुरु होते. म्हणजे ते गुरूंचे गुरु होते. ‘ गुरूणां गुरुः ’ हीच पदवी त्यांना सार्थ होय !

केतकरांच्या कादंबऱ्यांचा प्रकार कांही वेगळाच आहे. नायक, नायिका, खलनायक त्यांत सहसा भेटणार नाहीत. नायिकेवरील संकटांचें निवारण करून खलनायकाचा पाडाव करून, नायकाचें नायि-

केशीं लग्न झालें, असलें छापातलें कथानक त्यांत दिसणार नाही. आपल्या डोक्यांतले शेकडो विचार लोकांना सांगतां यावे म्हणून केतकरांनी कादंबऱ्या लिहिल्या. आपलें सामाजिक निरीक्षणहि ते कादंबरींत मांडीत. गोष्टीच्या रूपाने सांगितलेले विचार व माहिती म्हणजे त्यांच्या कादंबऱ्या. तेव्हा, कथानक आणि पात्रें यांपेक्षा विचार व माहिती यांनाच त्यांच्या कादंबऱ्यांत महत्त्व असतें. त्यामुळे गोष्टी-साठी कादंबऱ्या वाचणारे वाचक त्यांच्या कादंबऱ्यांना नाकें मुरडतात. त्यांच्या कादंबऱ्यांबद्दल समंजस टीकाकारांत तीव्र मतभेद आहेत. कोणी म्हणतात, या कादंबऱ्या उत्तम आहेत; कोणी म्हणतात, या कादंब-ऱ्याच नव्हेत ! पण जें आहे तें उद्बोधक आहे, विचारप्रवर्तक आहे, ज्ञानदायक आहे, याविषयी कोणाचें दुमत नाही. ज्यांना ज्ञानाची गोडी नाही, नव्या विचारांनी ज्यांना धक्का बसत नाही त्यांना केतक-रांच्या कादंबऱ्या आवडत नाहीत. भूक नसलेला मनुष्य भाकरींची चवड दिसली तर तीवर झडप घालील का ? नाही. पण भुकेलेला मनुष्य त्या हां हां म्हणतां फस्त करील. ज्याच्या ‘ डोक्याला ’ भूक लागली आहे तो केतकरांच्या कादंबऱ्यांवर हमखास तुटून पडणारच ! त्यांचें काव्य व नाटक त्यांच्या कादंबऱ्यांसारखेंच आहे, एवढें म्हटलें की त्याचें आणखी वर्णन करण्यास नको.

केतकरांचें वाङ्मय गुणवान् आहे; पण तें रूपवान् नाही. ‘ एन्. बिट्. ’च्या शेजारीं त्यांचा ज्ञानकोश उभा केला तर अद्ययावत्, टापटिपीच्या, सुटाबुटांतल्या गृहस्थाशेजारीं धाबळीवाला शामळभट उभा राहिल्यासारखें वाटेल. त्यांच्या कादंबऱ्या सुंदर वेष्टनें घालून, दुमदार आकारांत, वळणदार टाइपांत छापलेल्या नाहीत. बेंगरूळपणें एखाद्या

कॅटलॉगसारख्या त्या बहुतेक छापल्या आहेत. — आणि त्यांचीं नांवें तरी काय ? एकीचे नांव "परागंदा आणि भारतीय समाजाची सरहद्द" ! तर दुसरीचें नांव "गोंडवनांतील प्रियंवदा व घरकुट्टे घराण्याचा इतिहास" ! त्यांची भाषा तशीत खडबडीत, भोंगळ, क्वचित् क्लिष्ट, क्वचित् संस्कृत वळणाची, तर क्वचित् इंग्रजी फॅशनची अशी आहे. फडक्यांच्या कादंबऱ्या किंवा केळकरांचे लिहिणें तुम्हीं वाचलें असेल. दोघेहि खुसखुशीत, चुरचुरीत आणि ललितलुलित लिहितात. अगदी ओठांनी चिरोटे खाल्ल्याचा भास होतो. पण केतकरांची शैली अगदी वेगळी. ते शब्दाकडे लक्षच देत नाहीत. शब्दांत हवा तो अर्थ असला म्हणजे झालें; तो कसा दिसतो, कानाला कसा लागतो, सोपा आहे कीं अवघड आहे, इकडे त्यांचें लक्ष नसे. जशी भाषेची रचना तशी पुस्तकाची रचनाहि ते काळजीपूर्वक करीत नसत. त्यांचीं इंग्रजी पुस्तकें व एकदोन मराठी पुस्तकें तेवढींच ठाकठीक रचलेलीं सापडतील. बाकी सर्वत्र रचनेची अव्यवस्था आहे. अस्ताव्यस्त माजलेल्या अरण्यासारखे त्यांचें पुस्तक असतें. सूक्ष्म व भव्य विचारांच्या वेली नि वृक्ष त्यांत ऐसपैस पसरलेले ! त्यांत बागेचा रेखीवपणा सापडावयाचा नाही. त्यांच्यापाशी विचार फार आणि वेळ थोडा, यामुळे असें झालें. शिवाय त्यांच्या स्वभावांतहि नखरा, टापटीप कमी होती. अरण्यांत घनगर्जना करीत हिंडणारा सिंह आपल्या आयाळीचा 'क्रॉप' करतो का ? तसेंच त्यांचें होतें.

येथवर केतकरांच्या वाङ्मयाची माहिती तुम्हीं वाचली; तीमुळे केतकरांचें एखादे पुस्तक वाचावे अशी इच्छा तुमच्या मनांत साहजिक उत्पन्न झाली असेल. तुम्ही म्हणाल, 'कोणते पुस्तक वाचूं आम्ही ?'

तुमच्या या प्रश्नाला उत्तर देणें कठिणच आहे. कारण तुमच्यासारख्या किशोरांसाठी केतकरांनी कांहीहि लिहिलेलें नाही. तेव्हा, उत्तर एवढेंच देतां येईल, की ज्याला पेलेल त्याने केतकरांचें कोणतेंहि पुस्तक किंवा लेख वाचावा. सध्या केतकरांसंबंधी तुम्ही जें वाचीत आहां तें मात्र नीट मनांत जपून ठेवा. ती ज्ञानाच्या पुढील प्रवासाची शिदोरी आहे. ' केतकर ' पचवण्याचें सामर्थ्य तुमच्यांत येईपर्यंत ही शिदोरी तुम्हांला उपयोगी पडेल.

## अभ्यास

१ केतकराचे वाङ्मय ' उच्च ' आहे, असें का समजतात ?

२ केतकर-वाङ्मयाचा एकेक गुणविशेष सांगणारीं वेचक पांच वाक्यें लिहा.

३ केतकराचें वाङ्मय ' रूपवान् ' नाही, म्हणजे काय ?

४ केतकराचे विक्षिप्त वाटणारे विचार कोणते ?

# ५. अवांतर उद्योग

ज्ञानकोशाचें एकच कार्य केतकरांनी केलें असतें तरी महाराष्ट्रांतल्या कर्तृत्ववान् पुरुषांत त्यांची गणना झाली असती. त्यांनी केवळ लेखनच केले असते तरी जगांतल्या विद्वानांत त्यांचे नांव घेतले गेलें असते. पण केतकरांचे व्यक्तित्व असे थोर, की या दोन्ही गोष्टी करून शिवाय त्यांनी इतर अनेक उद्योग केले. त्यांचा स्वभाव अत्यंत उद्योगशील होता. त्यांच्या डोक्यांत सदैव शेकडो कल्पना घोळत असत आणि त्या कल्पना व्यवहारांत आणण्याची त्यांना घाई असे. त्यामुळे नाना खटाटोपांत ते एकाच वेळीं गुंतलेले असत. एखादे मोठें कार्य जो मनुष्य हाती घेतो त्याला त्या मोठ्या कार्याला पोषक अशीं लहान लहान कामे उभीं करावी लागतात. ज्ञानकोशाच्या अनुषंगाने केतकरांना असेंच करावें लागलें. त्यामुळेहि त्यांचे व्याप वाढत गेले. त्यांच्यामागे सतरा उद्योग नेहमी असण्याचें आणखीहि एक कारण आहे. हें कारण म्हणजे आयुष्याला ‘प्रयोग’ समजण्याची त्यांची वृत्ति. या वृत्तीमुळे अपयशाला ते भीत नसत किंवा अपऱ्या कामाची चिंता

करीत नसत. जें झालें तें अपुरें होवो कीं अयशस्वी होवो; त्यांतून जो अनुभव किंवा जें ज्ञान मिळेल त्यांतच त्यांना समाधान असे. पूर्वीच्या अपयशाने न खचल्यामुळे नव्या कामांत हात घालण्यास ते सदैव सज्ज असत आणि मग कामांची संख्या फुगत जाई. नव्या योजना व नवीं कामें काढून तीं अपुरीं राहिलीं तरी समाजाला नवीं कार्यक्षेत्रें दाखविल्याचें श्रेय मिळतें, असें त्याना वाटे. त्यामुळे कसलेंहि काम हातीं घेण्यास ते कचरत नसत. या वृत्तीमुळेच नुकसानीचीं कामें, हास्यास्पद वाटणारीं कामें, अवाढव्य वाटणारीं कामें, कोणाच्या कल्पनेंताहि न आलेलीं कामें ते बिनदिक्कत स्वीकारीत. थोडक्यांत म्हणजे, या ना त्या कारणाने ते कामांच्या झुंडींत सदा गुंतलेले असत. त्यांची पुरी ओळख करून घ्यावयाची असेल तर या कामाकडे नजर टाकली पाहिजे.

अमेरिकेस जाण्यापूर्वी, १९०६ मध्ये, त्यांनी 'महाराष्ट्र–वाग्विलास' या नांवाचें एक मासिक काढलें त्या वेळीं ते बी. ए. नापास झालेले होते, त्यांना पैशाचें पाठबळ मुळीच नव्हते आणि कोणत्याहि प्रतिष्ठित पुढाऱ्याची त्यांना मदत नव्हती. पण केवळ एका मित्रासाठी ते या उद्योगांत पडले. श्री. बाळकृष्ण संतुराम गडकरी हे त्यांचे बालपणापासून मित्र. गडकऱ्यांच्या कादंबऱ्या प्रसिद्ध व्हाव्या व त्यांची प्रतिभा खुरटून जाऊं नये, असा मासिक काढण्यांत त्यांचा उद्देश होता. मासिक काढतांना पहिले चार महिने त्यांनी खूप कष्ट केले आणि धडाडीने मासिकाचा संसार थाटून दिला. पुढे अमेरिकेस जाण्याची वेळ येऊन त्यांना मासिकाचा भार गडकऱ्यांच्यावर टाकावा लागला. ते अमेरिकेस गेल्यावर गडकऱ्यांनी चिकाटीने मासिक

चालविलें. पण तिसऱ्या वर्षाच्या अखेरीं पैशाच्या अभावीं त्यांना तें बंद करावें लागलें. या मासिकामुळे गडकऱ्यांच्या कादंबऱ्या प्रसिद्ध होऊन केतकरांचा मूळ उद्देश सफल झाला. शिवाय या मासिकांत ' गोविंदाग्रज ' या प्रसिद्ध कवीची कविता प्रथम प्रकाशांत येऊन मराठी भाषेची एक मोठीच सेवा घडली. मासिकामुळे केतकरांना व गडकऱ्यांना मिळून आर्थिक घस मात्र चांगलीच लागली. गडकऱ्यांना आपल्या मावशीचे गोट विकावे लागले आणि केतकरांचे सुमारें ३–४ शे रुपये बुडाले ! या अनुभवामुळे, येथून पुढे गडकरी प्रकाशनाच्या कामांत पुन्हा पडले नाहीत. पण अपयशाची डर केतकरांना कशी ती माहीतच नसल्यामुळे त्यांनी प्रकाशनाच्या धंद्यांतच पुढे लक्ष घातलें. महाराष्ट्र-वाग्विलासचा अनुभव आपणांला पुढे उपयोगी पडला, असें ते म्हणतात !

ज्ञानकोशाच्या अनुषंगाने केतकरांनी ' विद्यासेवक ' नांवाचे दुसरें एक मासिक १९२४ मध्ये सुरू केलें. ज्ञानकोशांतून गळलेले विषय द्यावे, ज्ञानकोशांतील विवाद्य विषयांवर चर्चा कराव्या आणि वाङ्मय, राजकारण, प्रकाशन, संशोधन वगैरे विषयांवर लेख प्रसिद्ध करावे इत्यादि उद्देश त्या वेळीं त्यांच्या मनांत होते. हें मासिक ५–६ वर्षे फारच चांगलें चालले. महाराष्ट्रातील प्रतिष्ठित व भारदस्त मासिकांत त्याची एकदम गणना होऊं लागली आणि विचारांना चालना देण्याचें कार्य त्याने उत्तम रीतीने बजावलें. ' विद्यासेवक ' हा नावाप्रमाणेच विद्येचा सेवक ठरला. त्यांतून केतकरांच्या कांही कादंबऱ्या, एक अपूर्ण नाटक, कांही स्फुट कविता आणि सुमारें ऐशी नव्वद लेख प्रसिद्ध झाले. ज्ञान-कोशाचें कार्य थांबल्यावर त्यांतील लेखक पांगले आणि साहजिकपणेंच ' विद्यासेवक ' बंद पडला. विद्यासेवक चिरकाल टिकला नाही; पण

त्याची गणना केतकरांच्या यशस्वी कार्यांत करावी लागेल. विद्यासेव-काप्रमाणे ज्ञानकोशाच्या अनुषंगाने केतकरांनी चालू केलेलें आणखी एक कार्य म्हणजे 'पुणें-समाचार' हें होय. ज्ञानकोश संपल्यानंतर त्यांतील लेखकवर्गाची संघटना फुटूं नये म्हणून 'पुणें समाचार' हें दैनिक वृत्तपत्र त्यांनी काढलें व त्यांत लेखकवर्ग गुंतविण्याचा प्रयत्न केला. १९२७ मध्ये 'पुणें समाचार' निघाला आणि प्रारंभी त्याने बरीच खळबळ उडवून दिली. मालिनी-खान-विवाह या नांवाचा हिंदु-मुसलमान विवाह तेव्हा बराच गाजला होता. त्याची पहिली बातमी पुणें-समाचारने दिली आणि त्यावर केतकरांनी विचारप्रवर्तक लेख लिहिले. दुसरींहि कांही सामाजिक प्रकरणे पुणें-समाचारने चव्हाट्यावर आणलीं. अशक्त व रोगी यांना 'कुक्कुटांडपाक' मिळ-ण्याची व्यवस्था शहरांतील प्रमुख स्थानीं व्हावी, अशी चमत्कारिक सूचना 'पुणें-समाचार' मधूनच केतकरांनी केली! पण पुढे पुणें-समाचारचा जोर मंदावला आणि दैनिकाचें साप्ताहिक होऊन तेंहि वर्षअखेर बंद पडलें. दैनिक चालविण्याचें तंत्र एकंदरींत केतकरांना जमलें नाही. गमतीची गोष्ट अशी की, शेवटच्या अंकांत, आपण दैनिक चालविण्यास नालायक आहोंत असें त्यांनी मनमोकळेपणाने कबूल केलें!

केतकर हाडाचे देशभक्त होते; त्यामुळे राजकारणांत ते साहजिक-पणेंच लक्ष घालीत. १९०६ पर्यंत ते एक जहाल क्रांतिकारक होते. शस्त्रास्त्रें जमवावीं, लष्करी शिक्षण घ्यावें आणि बंडाची तयारी करावी, असे त्यांचे विचार असत. इंग्रजी राज्य उलथून टाकण्यासाठी ते अधीर झाले होते. इंग्रज अधिकाऱ्यांना पानसुपारीस बोलवावें आणि गोळी घालून ठार करावें, असें बैठकींत बोलण्यापर्यंत त्यांची मजल

गेली होती. लष्करी शिक्षण घेण्याच्या उद्देशानेच ते अमेरिकेस जाण्यास निघाले होते. पण पुढे त्यांनी पुष्कळ वाचन केलें, पुष्कळ विचार केला आणि यशस्वी बंड अशक्य आहे, असें त्यांना वाटूं लागलें. मात्र अमेरिकेस जाण्याचा त्यांचा पहिला बेत बदलला नाही. अमेरिकेस जाण्याबद्दल आपण खूप बढाया मारल्या, तेव्हा त्या खऱ्या केल्याच पाहिजेत अशा ईर्ष्येने ते अमेरिकेस गेले! कालांतराने ते इतके बदलले, की पहिले क्रांतिमार्गी केतकर नंतर पूर्णपणे शांततावादी बनले आणि सनदशीर मार्गांचा पुरस्कार करूं लागले! त्यांच्यांत असा बदल झाला; पण सरकारचा त्यांच्यावरील संशय पुष्कळ दिवस कायम होता. ते अमेरिकेहून परत आल्यावर एक गुप्त पोलिस त्यांच्यामागे सावलीसारखा हिंडत असे. ते अनेकदा या पोलिसाची गंमत करीत. एकदा भुसावळ स्टेशनवर एक पोलिस जाऊन दुसरा पोलिस आला. पहिल्या पोलिसाने नुसतें बोट दाखवून केतकरांना दुसऱ्या पोलिसाच्या हवालीं केले. पण दुसऱ्या पोलिसाची नीट समजूत न पडून तो भलत्याच माणसामागे जाऊं लागला. तेव्हा केतकर त्याला म्हणाले, "बाबा रे, मी भयंकर मनुष्य आहे. माझ्यावर पाळत ठेव!" केतकर कोणत्या गावीं जाणार हें माहीत नसलें, की पाळत ठेवणाऱ्या पोलिसाची तारांबळ उडे. त्याला स्वतःसाठी कोणत्या गावचें तिकिट काढावें तें समजत नसे. तेव्हा केतकर स्वतःचें तिकिट त्यालाच काढावयास सांगत!— असो. कांही दिवसांनी केतकरांच्यावरील सरकारचा संशय दूर झाला व त्यांच्यामागचें पोलिसाचें शुक्लकाष्ठ संपलें.

ज्ञानकोश सुरू होण्यापूर्वी, १९१४ मध्ये ते मद्रासकडे गेले व मद्रासच्या काँग्रेसमध्ये त्यांनी भाषावार प्रांतरचनेसंबंधी पत्रकें वाटलीं.

भाषावार प्रांतरचनेवर मद्रासमध्ये त्यांचीं काही व्याख्यानेंहि झालीं. हीं व्याख्यानें आंध्र प्रांतांतील लोकाना आवडलीं आणि त्यांनी आपल्या प्रांतांत केतकरांना व्याख्यानाच्या दौऱ्यासाठी आमंत्रण दिलें. तेव्हा आंध्र प्रांत वेगळा करण्याची चळवळ सुरू झालेली होती; त्यामुळे केतकरांचा दौरा चांगलाच गाजला. त्यांनी आंध्रांच्या चळवळीला एका नवीन तत्त्वज्ञानाची जोड मिळवून दिली आणि कांही व्याख्यानें संस्कृतमधून-हि दिलीं. त्यांचीं व्याख्यानें इतकीं यशस्वी झालीं, की त्यांनी योजलेले कांही संस्कृत श्लोक राष्ट्रगीतासारखे तेथे म्हटले जाऊं लागले! पट्टाभिसीतारामय्या हे काँग्रेसचे प्रसिद्ध पुढारी त्या वेळीं त्याचे अनुयायी बनले होते! आज आंध्र प्रांताचा जन्म झाला आहे आणि महाराष्ट्र, कर्नाटक, गुजरात इत्यादि भाषिक प्रांत करण्याची चळवळ जोरावली आहे. पण केतकर पसतीस वर्षांपूर्वी या दिशेने खटपट करीत होते. भाषावार प्रांतरचना देशाच्या ऐक्यासाठी व सांस्कृतिक विकासासाठी झालीच पाहिजे, असें त्यांचें मत १९०९ पूर्वीपासूनच होते. यांत राष्ट्रासाठी दूरवर विचार करणाऱ्या त्यांच्या पल्लेदार दृष्टीचा स्पष्ट प्रत्यय येतो. असो. आंध्र प्रांतांतील दौरा आटोपून ते १९१५ च्या प्रारंभीं नागपूरास आले; आणि एका नव्याच चळवळीची काडी त्यांनी शिलगावून दिली. नागपूरास त्यांचें एक व्याख्यान झाले आणि त्या व्याख्यानांत ते मध्यप्रांताच्या जमाखर्चासंबंधी बोलले. त्यांनी असा मुद्दा मांडला, की इतर प्रांतांच्या मानाने केंद्र सरकार मध्यप्रांताकडून जास्त पैसा घेतें; पण मध्यप्रातावर खर्च मात्र कमी करतें. ही स्थिति बदलून मध्यप्रांतावर जास्त खर्च केंद्र सरकारने करावा म्हणून चळवळ केली पाहिजे. त्यांचा हा मुद्दा अगदी नवा होता; कोणाहि मुरब्बी पुढा-

त्याच्या लक्षामध्ये तोंवर तो आला नव्हता; त्यामुळे तो ऐकून सर्वच जण चकित झाले. व्याख्यानाने चांगली वैचारिक खळबळ उडून केतकरांनी दाखविलेल्या दिशेने पुढे प्रयत्नांना सुरुवात झाली. केतकरांचीं आंध्र प्रांतांतील व्याख्यानें किंवा हें नागपूरचें व्याख्यान म्हणजे प्रत्यक्ष चळवळ नव्हती. पण चळवळींना चालना देण्याचा व त्यांना दिशा दाखविण्याचा तो प्रयत्न होता. असे प्रयत्न केतकर नेहमीच करीत. राजकारणाच्या रोजच्या धकाधकीत गुंगलेल्या पुढाऱ्यांना अभ्यासु विचारकांनी आपले विचार ऐकवावेत, असे त्यांना वाटे व ते स्वतःला 'शिक्षक' समजत म्हणून असे यत्न त्यानी करणें साहजिक होतें.

१९२० मध्ये म. गांधींनी अनत्याचारी असहकारितेची चळवळ सुरू करून हिंदुस्थानांत एका नव्या युगाला प्रारंभ केला. त्यांच्या चळवळीमधील अनत्याचार किंवा अहिंसा आणि असहकारिता हीं दोन्ही तत्त्वें नवीन होतीं. त्यामुळे त्यांनी अनेक विचारी पुरुषांना विचार करण्यास भाग पाडलें. देशांतल्या चळवळींना विचाराचें बळ पुरविणें आपले कर्तव्य होय, असे केतकर समजत; तेव्हा त्यांनीहि म. गांधींच्या चळवळी-संबंधी आपले विचार प्रसिद्ध करण्यास प्रारंभ केला. हे विचार प्रथम विद्यासेवकांत प्रसिद्ध होऊन नंतर 'निःशस्त्रांचें राजकारण' या पुस्तकांत एकत्र केले गेले. या पुस्तकामध्ये केतकरांनी म. गांधींच्या विचारांना अर्थ-शास्त्राची जोड देण्याचा प्रयत्न केला आहे व करबंदीची चळवळ यशस्वी करण्याचे मार्ग सांगितले आहेत. हिंदुस्थानला स्वातंत्र्य देण्यांत इंग्लंडचा फायदा आहे, हा अभिनव सिद्धान्त त्यांनी तेथेच मांडलेला आहे. केतकरांच्या पुस्तकाने राजकीय विचारांना चांगलीच गति मिळाली

आणि दूरदृष्टीने व शास्त्रीय पद्धतीने राजकारणाचा विचार कसा करावा, याचा चांगला नमुना लोकांसमोर आला. आपल्या विचारांस अनुसरून चळवळ करण्याची केतकरांची इच्छा होती, म्हणून ' स्वयंनिर्णयी संघ ' नांवाची संस्था त्यांनी १९२७ मध्ये स्थापन केली पण या संस्थेने प्रत्यक्ष हालचाल कांहीहि केली नाही. अनेकांचीं मनें राखावी, अनुयायी गोळा करावे आणि चळवळीची उभारणी करावी, हे केतकरांच्या स्वभावांतच नव्हतें. ते विचार सांगणारे ' राष्ट्रीय शिक्षक ' होते, हें या प्रकरणांत पुन्हा एकदा दिसून आलें.

१९३० नंतर केतकरांच्या राजकीय विचारांना कांही वेगळें वळण लागलें. हिंदुस्थानचा इतिहास पाहून त्यांनी असा निष्कर्ष काढला, की ब्रिटिश पार्लमेंटची हिंदुस्थानवर असलेली सत्ता बेकायदेशीर होय. कायदेशीर दृष्टीने हिंदुस्थान स्वतंत्र व सार्वभौम आहे. जें कायदेशीर आहे त्याची अंमलबजावणी न्यायालयांतून करवून घेतां येते. तेव्हा हिंदुस्थानचें स्वातंत्र्य न्यायालयांत फिर्याद करून प्रस्थापित करतां आलें पाहिजे. त्यांचा हा निष्कर्ष अगदी नवा आणि कोणास न पटण्यासारखा होता. पण त्यांनी तो धूमधडाक्याने सांगण्यास प्रारंभ केला. त्यांच्याकडे कोणी लक्ष देईना; त्यांचें हसें होऊं लागले; तेव्हा आपल्या निष्कर्षाप्रमाणें आपणच हालचाल करावी, असें त्यांनी ठरविलें. १९३२ मध्ये भारतमंत्र्याविरुद्ध त्यांनी न्यायालयांत फिर्याद दाखल केली. भारतमंत्र्याने ब्रिटिश पार्लमेंटची बेकायदेशीर सत्ता हिंदुस्थानवर लादूं नये, अशी मागणी त्यांनी फिर्यादीमध्ये केली होती. त्यांनी व्हाइसरॉयला आणि बंगालच्या व मुंबईच्या गव्हर्नरांनाहि नोटिसा पाठवल्या व भारतमंत्र्यातर्फे आलेले पार्लमेंटचे हुकूम त्यांनी पाळूं नयेत म्हणून त्यांना समज

दिली. पार्लमेंटच्या सभासदांकडे पत्रें पाठविणें, विधिमंडळांत भारत-मंत्र्याविरुद्ध ठराव आणणें वगैरे यत्नहि त्यांनी करून पाहिले. पण त्यांची फिर्याद कोर्टानें धुडकावून लावल्यामुळे त्यांना अखेर स्वस्थ बसावें लागलें. त्यांचे सर्व प्रयत्न एकंदरींत फुकट गेले. यानंतर १९३५ चा घटना-कायदा पार्लमेंटने मान्य केला. त्या कायद्याने हिंदुस्थानचें स्वातंत्र्य पार्लमेंटने कबूल केलें, असेंच केतकर धरून बसले. आपण केलेल्या फिर्यादीचें व इतर यत्नांचें हें फल होय, अशी त्यांची श्रद्धा होती. हिंदुस्थान स्वतंत्र झाला, या आनंदांत ते गर्क झाले ! पण कोणीहि मनुष्य हिंदुस्थानला स्वतंत्र समजत नव्हता, कॉंग्रेससारखी संस्था तर हिंदुस्थान स्वतंत्र व्हावा म्हणून खटपट करीत होती. यावर केतकरांना असें वाटे, की देश स्वतंत्र असतां तो स्वतंत्र करण्याची खटपट कॉंग्रेस करते म्हणजे ती थापा मारते आणि लोकांना फसवून पैसे उपटते. तेव्हा, महाराष्ट्र-प्रांतिक-कॉंग्रेसच्या अध्यक्षांवर त्यांनी फिर्याद लावली. ही फिर्याद त्यांच्या मृत्यूमुळे पुढे, अपूर्ण राहिली. भारतमंत्र्यावरील फिर्याद व ही फिर्याद म्हणजे केतकरांच्या विक्षिप्त-पणाचे अस्सल नमुने होत. या प्रकरणांत त्यांचे विचार भलतीकडेच वहावले आणि त्यांना तारतम्य राहिलें नाहीं. पण जो मनुष्य शेकडो नवे विचार देशाला सतत सांगत राहातो त्याचे एकदोन विचार चुकले तरी क्षम्य समजलें पाहिजे. तसें होणारच, त्यांत कांही आश्चर्य नाही. आपण चुकलेल्या विचारांकडे लक्ष देऊं नये तर ते विचार पुढे मांडणाऱ्याचा सद्धेतु पाहावा. फिर्यादी लावण्यांत केतकरांची देशभक्ति, दीर्घोद्योग आणि बेडरपणा हे गुण स्पष्ट झाले, यांत संशय नाही.

वाङ्मयीन व राजकीय उद्योगांप्रमाणे इतर हरतऱ्हेचे उद्योग केत-

करांनी केले; कारण राष्ट्राच्या सर्वांगीण प्रगतीचे ते भोक्ते होते. नागपूरचें विद्यापीठ निघण्यापूर्वीच, १९१५ मध्ये, त्यांनी आगामी नागपूर विद्यापीठांत मराठींतून शिक्षण मिळावें, म्हणून चळवळ केली. पुणें-विद्यापीठ काढण्याची कल्पना निघाली तेव्हा 'लोकशिक्षण' मासिकांत लेख लिहून नव्या विद्यापीठाच्या रचनेबद्दलच्या आपल्या कल्पना त्यांनी पुढे माडल्या. १९२० सालीं त्यांनी पुणें-नगर-परिषद् नांवाची संस्था काढली व तिच्यामार्फत "पुणें १९३०" नांवाची योजना प्रसिद्ध केली. दहा वर्षांत पुणें शहरांत किती मोठमोठ्या सुधारणा करतां येतील, हें त्या योजनेंत दाखविलें होतें. ज्ञानकोश निघाला तेव्हा, "केतकर्स बँक अँड एजन्सी" ही संस्था त्यांनीं स्थापन केली. बँकेचा व एजन्सीचा धंदा या संस्थेमार्फत करावा आणि तीमधील पैसा ज्ञानकोशासाठी वापरावा, अशी त्यांची योजना होती. पण अमेरिकेंत मंदीची लाट उसळून तिचा परिणाम या संस्थेवर झाला व ती बुडाली. मराठी ज्ञानकोशाच्या आवृत्त्या हिंदी, गुजराथी, तामीळ, कानडी इत्यादि भाषांमध्यें काढाव्या म्हणून केतकरांनी बरीच खटपट केली. हिंदुस्थानच्या उपयोगाचें जें ज्ञान मराठींत मांडलें गेलें तें इतर भाषांतहि मांडलें जावें आणि त्याचा अधिक उपयोग व्हावा, ही या खटपटींत त्यांची दृष्टि होती. त्यांनी गुजराती ज्ञानकोशाचे दोन भाग आणि हिंदी ज्ञानकोशाचा एक भाग प्रसिद्ध केला; पण पुढे अनेक कारणांनी हें इतर भाषांत ज्ञानकोश करण्याचें काम अपूर्ण राहिलें. 'समाजशास्त्र मंडळ' नांवाचें एक मंडळ इतिहासाचार्य राजवाड्यांनी आणि केतकरांनी समाजशास्त्राच्या अभ्यासासाठी स्थापन केलें होतें; पण कांही दिवस चालून तें बंद पडलें. चातुर्वर्ण्याच्या रक्षणासाठी

" चातुर्वर्ण्य-संरक्षक-पीठ " नामक संस्था केतकरानी काढली होती व तिच्या वतीने कांही योजना प्रसिद्ध केली होती. याखेरीज 'स्त्रीकर्म-सदन' म्हणजे स्त्रियांना शिवणाचें वगैरे काम देणारी संस्था, 'बिब्लिओग्राफिक सिंडिकेट' म्हणजे संशोधनात्मक मासिकांतील लेखांची सूचि, 'नवसंहिता' म्हणजे सर्व धर्मशास्त्रीय ग्रंथांतील निवडक वचनांचा संग्रह, जातींचीं संशोधक मंडळें, गहाणवटाची पावती मिळावी म्हणून खटपट इत्यादि खूप खटपटी आणि लटपटी केतकरांनी केल्या. त्या सर्वांत त्यांच्या उद्योगांचा मोठा व्याप आणि त्यांच्या विचाराचा विस्तृतपणा दिसून येतो. केतकर सर्वत्र यशस्वी झाले नाहीत; त्यांचीं बरींच कामे अपुरीं राहिलीं. पण त्यांच्या अपुऱ्या व अयशस्वी कामांनीहि प्रगतीच्या नव्या नव्या वाटा लोकांना दाखवून दिल्या.

केतकरांच्या जातीचीं माणसें महाराष्ट्रांत क्वचितच झालीं. त्यामुळे अशा माणसांच्या उद्योगाचें रहस्य कसें उकलावें, हें आपणांला फारसें समजलेलें नाही. आपणांकडे अभ्यासु माणसे चळवळी करीत नाहीत आणि चळवळीं माणसें अभ्यास करीत नाहीत. चळवळ्या माणसांनी अभ्यास केलाच तर तो त्यांच्या चळवळीशीं संबद्ध नसतो, निदान तो शास्त्रीय व सर्वांगीण नसतो. अभ्यासु माणसांनी चळवळ केली तर ती अगदी सोवळी आणि थोडकी असते. बहुधा अभ्यासाची आणि चळवळीची, ज्ञानाची आणि व्यवहाराची फारकतच झालेली दृष्टीस पडते. पण केतकरांचा प्रयत्न असा होता, की अभ्यासाची चळवळीशीं सांगड घालावी आणि ज्ञान व्यवहाराला जोडून द्यावें. आपले विचार पारखण्यासाठी किंवा प्रचारण्यासाठी ते चळवळी काढीत आणि चळवळी काढून

त्यांतून पुन्हा ज्ञान मिळवीत. ते एक अभ्यासु चळवळे होते; एक ज्ञानी व्यवहारी होते. अशांचे उद्योग अपुरे व अयशस्वी झाले तरी हळहळ वाटण्याचें कारण नाही. त्यांचे उद्योग नवे विचार पुढे आणण्यासाठी, समाजाला गति देण्यासाठी आणि समाजाच्या नाना अंगांना पुढे ढकलण्यासाठी असतात. उद्योगाची पूर्णता किंवा यशस्विता हा त्यांचा हेतु नव्हे. दूरदृष्टीचें ज्ञान पुस्तकांत पडून न राहातां समाजांत मुरावें हाच त्यांचा हेतु. केतकरांच्या उद्योगांकडे या दृष्टीने आपण पाहिलें पाहिजे; म्हणजे त्यांच्या अनंत धडपडींचें मर्म आपणांस समजूं शकेल. त्यांच्या धडपडीने समाज अनेक कल्पना शिकला यांत संशय नाही. त्या वेळीं नागपूर विद्यापीठांत मराठींतून शिक्षण देण्याचा केतकरांचा प्रयत्न निष्फळ ठरला; पण आज त्या विद्यापीठाने मराठीचा स्वीकार केला आहे. केतकरांचें 'समाजशास्त्रमंडळ' तेव्हा थोडीशी गडबड करून आटोपलें, पण आज समाजशास्त्राकडे आपलें लक्ष वेधत आहे. केतकरांच्या अनेक उद्योगांमागील कल्पना आज असा जीव धरीत आहेत. तेव्हा केतकरांच्या उद्योगांचें मापन यशाने किंवा पूर्णतेने होत नाही. त्या उद्योगांनी समाजाला ज्या कल्पना दिल्या त्या कल्पनांनी त्यांचें मापन होतें. जसजसा आपला समाज पुढे जाईल व केतकरांच्या कल्पना उचलील तसतशी केतकरांची किंमत अधिकाधिक कळूं लागेल.

## अभ्यास

१. केतकरांनी चालविलेल्या नियतकालिकांची नावे सांगा व यशाच्या दृष्टीने त्यांचा क्रम लावा.

२. केतकरांच्या राजकीय विचारांत कोणकोणते बदल झाले ?

३. केतकरांच्यामागे अनेक उद्योग नेहमी लागलेले असत; ते का ?

४ केतकरांच्या उद्योगाचें रहस्य कशात आहे ?

## ६. कौटुंबिक जीवन

आपल्या हिंदुत्वाचा केतकर अभिमान बाळगीत आणि आपल्या ब्राह्मण्याचाहि त्यांना मोठेपणा वाटे. सर्व स्वकीय गोष्टींबद्दल त्यांना उत्कट प्रेम असे. असे असतांना त्यांनी एका गोऱ्या मडमेशीं लग्न केलें; तेव्हा सर्वांनाच मोठा अचंबा वाटला. गोऱ्या मडमेशीं लग्न कसें झालें, तो वृत्तांत मोठा मनोरंजक आणि वाचनीय आहे. त्याचें असें झालें, की अमेरिकेंतला अभ्यासक्रम संपविल्यानंतर हिंदुस्थानांत परत येतांना केतकर वाटेंत इंग्लंडमध्ये सुमारें वर्षभर थांबले होते. त्या वेळीं इंग्लंडमधील ' दि नोबॉडीज् क्लब ' नामक मंडळाचे ते चिटणीस होते. या मंडळांत श्रीयुत कोहन नांवाचे एक जर्मन–ज्यू गृहस्थ आपल्या दोन मुलींना घेऊन येत असत. त्या मुलींपैकी थोरल्या मुलीचें नांव कु. ईडिथ व्हिक्टोरिया कोहन. तिच्याशीं मंडळामध्ये साहजिपणेंच केतकरांची ओळख झाली आणि तिचें मन केतकरांकडे आकृष्ट झालें. वास्तविक, पाहाता त्या वेळीं एखाद्या गोऱ्या तरुणीचें मन आकृष्ट करण्यासारखी केतकरांची सांपत्तिक परिस्थिति नव्हती. ते तर अगदी गरिबींत कसें-

असें आपलें जीवन जगवीत होते. खिशांत बससाठी पैसा नसला म्हणजे लंडनसारख्या अफाट शहरांत ते पायींच हिंडत होते आणि जेवणासाठी पैसे नसले म्हणजे मांस गॅसच्या दिव्यावर भाजून ते भूक शांत करीत होते. पण त्यांच्या विद्वत्तेवरच कु. कोहन मोहून गेल्या होत्या. केतकरांपाशी संपत्ति नव्हती पण विद्या होती. अमेरिकेंत त्यांच्या पहिल्या पुस्तकाचा खूप गौरव झाला होता आणि इंग्लंडमध्ये त्यांनी दुसरे पुस्तक लिहिलें तेंहि चांगलें गाजत होतें. इंग्लंडमधील प्रस्थांशीं या विद्वान् हिंदु तरुणाच्या ज्या पांडित्यपूर्ण झटापटी होत त्या कोणाच्याहि मनांत कौतुक उत्पन्न करीत. तेव्हा कु. कोहन यांना केतकरांबद्दल आकर्षण वाटावे, हें साहजिक होय. त्यांतून हिंदुस्थान-कडे कु. कोहन यांचा पहिल्यापासून कांही ओढा होता. त्यांनी रामायण, भगवद्गीता वगैरे ग्रंथ वाचले होते आणि नलदमयंती, सावित्री वगैरेंच्या कथा नजरेखाली घातल्या होत्या. हिंदुस्थानांत अजून कण्वासारखे ऋषिमुनि आणि शकुंतलेसारख्या, सावित्रीसारख्या आदर्श कन्या असतील अशी त्यांची गमतीदार समजूत होती ! त्यामुळे जो हिंदु विद्वान् तरुण त्यांच्या सान्निध्यांत आला त्याला त्यांनी आपलें मन वाहून टाकलें. मात्र आपल्या मनांतली भावना त्यांनी केतकरांजवळ स्पष्टपणें बोलून दाखविली नाही. केतकर जेव्हा हिंदुस्थानांत येण्यासाठी बोटी-वर चढले तेव्हा त्यांच्या डोळ्यांतून अश्रु ओघळले. त्या अश्रूंनीच त्यांचें मन प्रथमतः केतकरांना बोलून दाखविलें. पुढे, हिंदुस्थानांत केतकर आल्यानंतर दोघांमध्ये पत्रव्यवहार होऊं लागला आणि दोघांचें प्रेम अधिक प्रकट होऊन तें दृढ होत गेलें.

हिंदुस्थानांत आल्यावर केतकरांनी ज्ञानकोशाच्या महत्कार्याला प्रारंभ

केला आणि त्यांतून कु. कोहन यांच्याशीं त्यांचा अधिकाधिक संबंध येऊं लागला. ज्ञानकोशासाठी अनेक जर्मन, डच, फ्रेंच वगैरे भाषांमधील ग्रंथांचीं भाषांतरें करण्याची आवश्यकता भासूं लागली तेव्हा हिंदुस्थानांत तें काम करणारा योग्य मनुष्य न मिळाल्यामुळे केतकरांनी कु. कोहन यांची त्या कामीं निवड केली. कु. कोहन 'सेंट ॲण्ड्रूज' नामक स्कॉटलंडमधील विद्यापीठाच्या पदवीधर होत्या, येना वगैरे जर्मन विद्यापीठांतून त्यांचा अभ्यास झाला होता, 'तौलनिक धर्मशास्त्र' या विषयांत सन्मान मिळवून त्यांनी पदवी घेतली होती आणि फ्रेंच, डच, जर्मन या भाषा त्यांना अवगत होत्या. तेव्हा केतकरांची निवड उत्कृष्ट होती, यांत शंका नाही. कु. कोहन यांनी आपलें कामहि चोख बजावलें. शिवाय ज्ञानकोश-मंडळाकडून त्यांनी फारच थोडा मोबदला घेतला. पुढे, अधिक काम करण्यासाठी त्यांनीं हिंदुस्थानांत यावें, असें ठरलें आणि त्या १९१९ मध्ये हिंदुस्थानांत आल्या. सुमारें ६ महिने काम केल्यानंतर ज्ञानकोशांतील काम त्यांनी सोडलें आणि त्यांचा केतकरांशीं विवाह झाला. या विवाहाने ज्ञानकोश-मंडळांतील कांही चालकांचें मात्र पोट दुखूं लागलें. कु. कोहन हिंदुस्थानांत आल्या तेव्हा त्यांचा भाडेंखर्च मंडळाने दिला होता आणि पुढे कु. कोहन यांचा विवाह केतकरांशीं झाला; तेव्हा हे चालक म्हणूं लागले, की केतकरांनी ज्ञानकोशाच्या खर्चांतून स्वतःच्या बायकोला हिंदुस्थानांत आणवलें ! खरें म्हणजे, चालकांच्या ठरावावरूनच कु. कोहन यांना भाडेंखर्च दिलेला होता आणि हिंदुस्थानांत येईपर्यंत त्यांचा विवाहाचा बेत ठरलेला नव्हता. तेव्हा या आरोपांत कांही तथ्य नव्हतें. बेडर वृत्तीच्या केतकरांनी अर्थातच या कुत्सित आरोपाला मुळीच भीक घातली नाही.

केतकरांचें आणि कु. कोहन यांचें एकमेकांवर प्रेम होतें; पण त्यांचा विवाह पहिल्या परिचयानंतर सुमारें आठ वर्षांनी झाला. याचें कारण असें होतें, की विवाहाबद्दल केतकर बरेच साशंक होते. ही युरोपीय स्त्री हिंदुस्थानांत आली आणि तिने आपली गुलामागिरी बघितली म्हणजे तिचें मन बदलणार तर नाही ना, असा संशय त्यांना येई. शिवाय त्यांना वाटे, की गोऱ्या बाईबरोबर लग्न केल्यास भ्रष्टाकार झाल्याची जिकडे तिकडे ओरड होईल, समाज आपणांशीं दूरपणाने वागेल आणि मग आपणांलाहि कदाचित् पश्चात्ताप होईल. त्यामुळें त्यांनी लग्नाची गोष्ट बरींच वर्षे काढली नाही. पण कु. कोहन ज्ञानकोशासाठी हिंदुस्थानांत आल्यावर त्यांचें मन मुळीच बदललें नाही. त्यांचें प्रेम पूर्णपणें अचल आणि उत्कट होतें. त्यांनी लो. टिळकांना आपल्या लग्नाबद्दल सल्ला विचारला, तेव्हा टिळकांनी हिंदु व युरोपीय यांच्या मिश्र लग्नास संमति दिली आणि म्हटलें, की डॉ. केतकर हा श्रीमान् मनुष्य नाही; आपल्या लेखणीच्या जोरावर त्याची उपजीविका चालणार; तेव्हा हें लक्षांत घेऊन काय तें करा. पण दारिद्र्यापुढे नमण्याइतकें कु. कोहन यांचें प्रेम दुर्बल नव्हतें. आपल्या प्रेमामुळे त्यांनी केतकरांच्या मनांतला संशयदेखील पार धुऊन टाकला आणि लग्नाचा निश्चय पक्का ठरला. निश्चय ठरल्यावर केतकरांनी कु. कोहन यांना प्रथमतः हिंदु करून घेतलें. त्या वेळीं त्यांचा हिंदुत्वाचा अभिमान तर प्रकट झालाच; पण नव्या कल्पना समाजांत रुजवण्याची त्यांची हौसहि दिसून आली. शुद्धीकरणाचे नवे विधि न स्वीकारतां 'व्रात्यस्तोम' नांवाचा वेदांतला विधि त्यांनी हुडकून काढला व त्या विधीप्रमाणे कु. कोहन यांचें हिंदूकरण केलें. त्यांनी

नवा विधि वेदांतून काढून युरोपीय व्यक्तीला हिंदु करून घेतल्या-मुळे कांही जणांना कसेसेंच वाटलें आणि ते म्हणाले, " अरे हा व्रात्य-स्तोम कसला ? हें केतकरांच्या व्रात्यपणाचें स्तोम आहे. " या विधी-नंतर दोन महिन्यांनी लग्नसमारंभ पार पडला. त्या समारंभाचा विशेष हा, की त्यांत सेनापति बापटांनी पुरोहिताचें काम केलें.

लग्न झाल्यानंतर केतकरांच्या घरगुती जीवनाला आरंभ झाला. त्यांचे वडील त्यांच्या लहानपणींच वारले होते. ते मॅट्रिक झाले तेव्हाच त्यांची आई मृत्युमुखीं पडली होती आणि त्यांची एकुलती एक थोरली बहीण दिवंगत झाली होती. ते अमेरिकेंत असताना त्यांचे वडील बंधुहि वारले होते. अशा रीतीने त्यांचे सर्व कुटुंब मृत्यूच्या दारुण तडाख्यांनी उध्वस्त झालें होतें. मॅट्रिकनंतर सुमारें वीस वर्षे गृहजीव-नाला ते मुकले आणि जगभर ज्ञानासाठी भटकत राहिले. त्यामुळे प्रेमळ व शुचिर्भूत कौटुंबिक जीवन त्यांना हवेसें वाटे; घरासंबंधी अतृप्त इच्छा त्यांच्या मनांत तरंगत राहात. लग्न झाल्यामुळे त्यांना घर मिळालें आणि त्यांचें एकलकोंडें, भटकें आयुष्य संपलें. पूर्वीच्या कु. कोहन आता सौ. शीलवतीबाई होऊन त्यांचा संसार सुखाचा कर-ण्यासाठी झटूं लागल्या. घर झालें, घरांत गृहिणी आली पण त्यांना दुर्दै-वाने मूल झालें नाही. शीलवतीबाईंना मुलांची हौस फार होती आणि बागडणारीं, हसणारीं मुलें घरांत नसतील तर घराला शोभा नाही, असें केतकरांना वाटत होतें. तेव्हा त्यांनी अनाथ मुलांना घरीं आणलें आणि त्यांचें पालनपोषण चालू केलें. ' लहान मूल पाळण्यासाठी हवें आहे ' अशी जाहिरात केतकरांनी दिली आणि प्रथमतः दामोदर हरि बापट नांवाच्या ३-४ वर्षांच्या अनाथ मुलाचा स्वीकार केला. नंतर

एक वर्षाच्या आंतील अनाथ मुलगी त्यांनी पदरांत घेतली. या मुलीचें नांव वीरा. दामू आणि वीरा घरांत आल्यानंतर मुलांचें हसणें, बागडणें, रडणें सुरू झालें आणि केतकरांच्या संसाराला एक तऱ्हेची पूर्णता आली. केतकरांच्या संसाराची उभारणी ज्या स्वरूपाची झाली त्या स्वरूपाची उभारणी लाखांत एखाद्याच्याच संसाराची होते. केतकर म्हणजे एक कोंकणस्थ ब्राह्मण; पण त्यांना गृहिणी मिळाली युरोपीय यहुदी ! आणि त्यांच्या घरांत मुलगा आला एका अनाथालयांतून व मुलगी आली एका सार्वजनिक प्रसूतिगृहांतून ! किती विचित्र संसार हा ! केतकरांचे विचार नेहमी जागतिक असत. जग एक व्हावे, अशी त्यांची इच्छा होती आणि तें एक होणार, अशी त्यांची भविष्यवाणी होती. योगायोग असा, की त्यांचा संसार मात्र ' जागतिक ' झाला आणि जग त्यांच्या घरांत, छोट्याशा स्वरूपामध्ये एक झाले.

दामू घरांत आल्यानंतर तीन चार वर्षांनी केतकरांच्या घरांत भुताटकीचे प्रकार होऊं लागले. दामूला कोणींतरी पछाडलें होतें आणि त्यामुळे हे प्रकार होत. घरांतल्या वस्तु अचानक उडत आणि भिंतीवर जाऊन आपटत; टांगलेल्या तसबिरी आवाज न करतां जमिनीवर संथपणें उतरत; पैसे, भांडींकुंडीं, कपडे वगैरे जिन्नस अदृश्य होत; पलंग फिरत आणि नाना चमत्कार घडून येत ! त्यामुळे घरात भीतीचें वातावरण पसरे आणि आर्थिक नुकसान बरेंच होई. भांड्यांच्या पळापळीमुळे अल्युमिनियमचा संसार थाटण्याचा प्रसंग शीलवतीबाईंवर आला. दामूला तर खूपच त्रास सोसावा लागला. खातां खातां त्याच्या हातांतला घास पळवला जाई; तो मध्येच कांही दिवस अदृश्य होऊन कोठेतरी प्रकटे; धुरांड्याच्या झरोक्यांतून

उतरतांना तो दिसे आणि त्याची बरीच दैना होई. हे चमत्कार मुद्दाम निरीक्षण करीत बसल्यास थांबत आणि दामू ढोंग करतो, असें पाहाणाऱ्यास वाटे. कित्येकदा गोष्टी अशा घडत, की दामूवर लबाडीचा आळ नेमका यावा. अशा वेळीं दामूला कोणीं लबाड म्हटलें तर त्याला अतिशय वाईट वाटे. केतकर पूर्वीपासून नास्तिक होते, भुताखेतांना ते थोतांड समजत; पण घरांतच हे प्रकार होऊं लागल्यानंतर त्यांना आपलीं मतें बदलण्याशिवाय गत्यंतर उरलें नाही. त्यांनी आणि शीलवतीबाईंनी या भुताटकीवर सर्व उपाय करून पाहिले; पण कोणत्याच उपायाची मात्रा भुताटकीसमोर चालली नाही. केतकर केडगावच्या नारायण महाराजांकडे गेले, गोंदवलेकर महाराजांच्या शिष्यापाशी जाऊन बसूं लागले, अंगारे–धुपारे व मंत्रतंत्र करूं लागले; तेव्हा अनेकांनी त्यांची थट्टा मात्र केली. कोणी म्हणाले, की ही भुताटकी खोटी आहे; कोणी म्हणाले, की स्वतःची जाहिरात करण्याची केतकरांची ही क्लृप्ति आहे, आणि कोणी म्हणाले, की केतकरांचा बलवान् मेंदू आता क्षीण झाला, त्यामुळे ते बुवांच्या नादीं लागतात ! या क्रूर थट्टेने केतकरांना थोडासा मनस्तापच झाला असेल. एकंदरीने अनेक वर्षे या भुताटकीने त्यांना व त्यांच्या सर्व कुटुंबाला बरीच पीडा दिली. कांही वर्षांनंतर तिचा उपद्रव आपोआप कमी होत गेला; आणि हळू हळू केतकरांच्यामागील एक काळजी दूर झाली.

आपल्या दोन्ही मुलांवर उभयता केतकर पतिपत्नींचें फार प्रेम होतें. मुलांचें पालनपोषण, आजार, स्वच्छता, कपडे इत्यादि गोष्टी खऱ्या मातेहून अधिक प्रेमाने शीलवतीबाईंनी केल्या. केतकरांनी मुलांना कधीहि शिक्षा केली नाही. मुलें त्यांना निःशंकपणें सर्व अडचणी सांगत,

शंका विचारीत आणि त्या ते निवारण करीत. मुलांना धाक दाखवून आपल्याच मताप्रमाणे वागण्यास लावणें त्यांना माहीत नव्हतें. स्वाभाविक प्रवृत्तीने मुलांचा विकास व्हावा, आपण त्यांच्या विकासाला योग्य मदत तेवढी निरलसपणें करावी, अशी त्यांची दृष्टि असे. ते मुलांना भारतीय इतिहास-पुराणांतील खूप गोष्टी सांगत. या गोष्टींचा कधी कंटाळा आला तर टॉलस्टॉय वगैरे पाश्चात्य लेखकांच्या गोष्टी ते कथन करीत. वीरा आणि ते एका मोठ्या पलंगावर निजून अशा गोष्टींत घटका घटका अनेकदा रंगून जात. वीराने गोष्ट सांगण्याबद्दल कितीहि पिच्छा पुरवला तरी ते नकार म्हणून देत नसत. मुलांशीं खेळण्याचीहि त्यांना बरीच हौस होती. मुलांबरोबर चित्राच्या रंगीत पत्त्यांचा डाव मांडण्याची त्यांची तयारी असे आणि मुलीला शिक्यांत बसवून तिला झोके देण्यांत वेळ फुकट गेल्याचें दुःख त्यांना होत नसे. आपल्या दामूशीं मुष्टियुद्ध खेळण्यांत आणि वीराबरोबर मोठ्या पलंगावर जोराने लोळण घेण्यांत त्यांना परमानंद होई. मग हसून हसून ते लालबुंद होत आणि शेवटीं धापा टाकूं लागत ! श्री. चित्रावशास्त्र्यांच्या हस्तें दामूची त्यांनी मुंज केली आणि त्याला दत्तक घेतलें.

लग्नानंतर पांच सहा वर्षे, सांपत्तिक दृष्टीने केतकरांचा संसार सुखाचा झाला. त्या वेळीं ज्ञानकोशामधून त्यांना मासिक सव्वाचारशे रुपये वेतन मिळे. या वेतनांत शीलवतीबाईंनी आपल्या मिळकतीची व शिलकीची सुमारें अकरा हजार रुपये भर घातली होती. त्यामुळे संसार सुरळीत चालला आणि एक बंगलाहि केतकरांना बांधतां आला. या बंगल्याचें नांव त्यांनी मोठ्या उमेदीने ‘ आशास्थान ’ असें ठेविलें; पण त्यांत राहाण्याचें सुख त्यांना फारसें उपभोगतां आलें नाही.

पुण्याच्या डेक्कन जिमखान्यावरील त्या बंगल्यांत मलेरियाचा त्रास होऊं लागला आणि बंगला सोडून त्यांना लष्करांत जाऊन राहावें लागलें. ज्ञानकोशाचें काम संपल्यानंतर आयुष्याच्या शेवटच्या दहा वर्षांत मात्र केतकरांना गरिबी आली. ज्ञानकोशामधलें त्यांचें वेतन थांबलें आणि उत्पन्नाची निश्चित बाब त्यांच्याजवळ राहिली नाही. प्राचीन महाराष्ट्राच्या इतिहासाला त्यांनी हात घातला पण तें संशोधनात्मक अवाढव्य काम पैसा देणारें नव्हतें. इतर भाषांतील ज्ञानकोशांचा प्रयत्न त्यांनी केला पण तो अर्धवटच राहिला. मिळून, स्फुट लेख, कादंबऱ्या, गोष्टी वगैरे किरकोळ लिखाणावर आणि 'प्राचीन महाराष्ट्राच्या' ज्या वर्गण्या येतील त्यांवर संसाराचा गाडा रेटीत बसण्याचा प्रसंग त्यांच्यावर आला. लहानपणापासून दारिद्र्यांत दिवस काढण्याची त्यांना सवय होती; म्हणून ते या प्रसंगांत धीर सोडून बसले नाहीत. अर्धपोटीं राहून त्यांनी दिवस काढले; पण मनाचें स्वास्थ्य बिघडूं दिलें नाही. पोटांत अन्न नसलें तरी ते सदा आनंदी, सदा उत्साही आणि सदा हसतमुख असत. ज्या दारिद्र्यानें सामान्य मनुष्य हताश झाला असता त्या दारिद्र्यांत त्यांनी प्रचंड ग्रंथ लिहिले! त्यांच्या मृत्यूच्या वेळीं, त्यांचे अंत्यसंस्कार करण्याइतकेहि पैसे शीलवतीबाईंजवळ नव्हते! अशा स्थितींत ज्याने ज्ञानाची उपासना केली तो मनुष्य सामान्य कोटींतला नक्की नव्हे.

केतकरांना सदासर्वकाळ शीलवतीबाईंनी अत्यंत प्रेमाने संसारांत साथ दिली. त्यांनी सुमारें ११ हजार रुपये संसारामध्ये स्वतःचे घातले, हें तुम्हांला ठाऊकच आहे. त्यांच्यापाशी पूर्वीचे दोन हजार रुपये शिल्लक होते; त्यांनी ज्ञानकोशांत जें काम केलें त्याचे सात हजार रुपये

त्यांच्यापाशी साठले होते आणि विंटरनिझ्झ या जर्मन ग्रंथकाराच्या 'भारतीय वाङ्मयाच्या इतिहासाचें' कलकत्ता विद्यापीठासाठी भाषांतर करून त्यांनी दोन हजार रुपये मिळवले होते. ते सर्व संसाराकडे लावण्यांत त्यांचें केतकरांवरील निरतिशय प्रेमच दिसून आलें. केतकरांच्या जविनांत त्यांनी आपलें जीवन एकरूप केलें, याचेंच तें एक द्योतक होतें. केतकरांचें वागणें बरेंच ऐसपैस आणि ढिलाईचें असे. ते एकदा चहा पिऊं लागले, की किती पितील याचा नेम नसे, ते सिगरेटाहि खूप ओढीत; वाटेल तेव्हा वाटेल तेवढें खात आणि काय हवें तें खात! पण शीलवतीबाई त्यांच्यावर सतत लक्ष ठेवून त्यांच्या स्वैर वागणुकीला आळा घालीत. त्यांची प्रकृति ठीक राहावी म्हणून त्या भारी जपत आणि मधून मधून त्यांना डॉक्टरकडे नेऊन त्यांची प्रकृति तपासून घेत. केतकरांचा दरिद्री संसार शीलवतीबाईंनी अखेरपर्यंत आनंदाने, समाधानाने आणि टापटिपीने पार पाडला. युरोपीय स्त्रीच्या गरजा हिंदी स्त्रीपेक्षा केव्हाहि अधिक असतात. पण शीलवतीबाईंनी आपल्या गरजांचें स्तोम कधी माजविलें नाही. केतकरांचीं सोवळींदेखील त्या अनेकदा गोल साडीप्रमाणे नेशीत असत. जुन्या धोतरांचे अभ्रे करून त्यावर नक्षी काढण्यांत त्या तरबेज होत्या. साधें खोकें नीट मांडून, त्याच्यावर छानदार झाकण घालून त्या कोच बनवीत व पितळेच्या फुलदाणींत फुलांचा गुच्छ रोज ताजा ठेवून घराला शोभा आणीत. केतकरांच्या फाटक्या संसाराला त्यांनी आपल्या काटकसरीचीं कितीक ठिगळें जोडलीं आणि तो धड केला. त्या सुविद्य असल्यामुळे केतकरांशीं चर्चा करण्यांत, त्यांचीं नवीं मतें ऐकण्यांत त्या सहभागी होत आणि केतकरांना त्यांच्या ज्ञानमय संसारांतहि सहधर्मिणी म्हणून साथ देत.

हिंदुस्थानांत सीता-सावित्री होऊन गेल्या म्हणून त्यांना हिंदुस्थानबद्दल प्रथम आकर्षण वाटत असे. योगायोगाने त्यांना हिंदुस्थानांत येतां आलें आणि त्यांनी सीता-सावित्रीचाच धडा गिरवून दाखविला.

चार ठिकाणचीं चार ठिगळें जोडून केतकरांचा संसार थाटला गेला, हें खरें; परंतु तो दुलईसारखा ऊबदार झाला. त्यांत दारिद्र्य होतें पण दैन्य नव्हतें. मुलें परक्याचीं होतीं पण त्यांच्याविषयी परकेपणा राहिला नव्हता. संकटें आलीं पण परस्परांमधील प्रेम दृढ करूनच तीं निघून गेलीं. गृहिणी मूळची परधर्मी, परदेशी व परजातीय होती पण ती स्वधर्मिणी, स्वदेशी व स्वजातीय झाली. वास्तव्य अठरापगड जातींच्या लष्करांत राहिलें पण मनांतला स्वसंस्कृतीबद्दलचा आदर तेथे कमी झाला नाही. झगे, बूटपाटलोण वगैरे पोषाख तेथे आला पण पगडी, धोतर व सोवळें सुटलें नाही. डॅडी, ममी हे साहेबी शब्द व साहेबी आचार तेथे दिसत पण दत्तकविधान आणि मौंजीबंधन हे हिंदु आचारदेखील तेथे चालत असत. शिळोप्याच्या गप्पांमध्ये या पतिपत्नींत मुलांचें दुखणेंखुपणें, भाजीपाला या सामान्य गोष्टींवर बोलणें होई पण जागतिक विचार आणि भविष्यकालीन प्रश्न या गोष्टी त्या बोलण्यांतून सुटत नसत. थोडक्यांत म्हणजे, केतकरांचा संसार म्हणजे एक सुंदर, गोड विरोधाभास होता. केतकरांच्या संसा-राला दुसऱ्या कोणाच्याहि संसाराची उपमा शोभावयाची नाही. तो संसार त्या संसारासारखा होता, असेंच म्हणावें लागेल.

## अभ्यास

१. एका युरोपीय स्त्रीशी लग्न होण्याचा योगायोग केतकराच्या आयुष्यात कसा आला ?

२. केतकराचा संसार ‘ जागतिक ’ झाला म्हणजे काय झालें ?

३. शीलवतीबाईनी सीता-सावित्रीचा धडा कसा गिरवला ?

४. “ केतकराचा संसार म्हणजे एक सुंदर, गोड, विरोधाभास होता ” या विधानाचें स्पष्टीकरण करा.

---

*

## ७. अंत

जीवनाचा लेख मृत्यूच्या पूर्णविरामाने संपावा असा निरपवाद नियम ईश्वराने करून ठेवला आहे. त्या नियमाप्रमाणे केतकरांचें जीवन मृत्यूचा पूर्णविराम मिळून संपलें, यांत आश्चर्य नाही. दुर्दैवाची गोष्ट एवढीच, की त्यांचा मृत्यु अकल्पितपणे आणि अकालीं घडून आला. मृत्यूची पाहिली, अस्पष्ट चाहूल लग्नानंतर १९२०–२१ मध्ये त्यांना लागली. त्या वेळीं ते विमा उतरण्यासाठीं गेले आणि त्यांच्या शरीरांत वैद्यकीय तपासणीमध्ये साखर आढळून येऊन त्यांचा विमा नाकारण्यांत आला. शरीरांतली साखर म्हणजे मधुमेहाचीं पूर्वचिह्नें होतीं; तीं बघून त्यांना आश्चर्याचा धक्काच बसला. तोंवर कसलेंच दुखणें त्यांना ठाऊक नव्हतें आणि त्यांची प्रकृति पूर्ण निकोप होती; त्यामुळे असें आश्चर्य वाटणें अगदी साहाजिकच होतें. लग्नानंतर ज्या मधुमेहाने असा चोरटा प्रवेश त्यांच्या जीवनांत केला त्याच मधुमेहाने शेवटीं त्यांच्या जीवनाला खग्रास ग्रहण लावलें. मधुमेहाचें पथ्य त्यांनी चालू ठेवलें होतें, साखर वर्ज्य करून चहांत साखरेच्याऐवजी सॅकरीनचे

कण घालण्याचा नियम ते पाळीत होते; मधून मधून डॉक्टरना प्रकृति दाखवून ते आहाराचें नियोजन करीत होते आणि त्यामुळे मधुमेहाने बरींच वर्षे त्यांना त्रास दिला नव्हता. सुमारें सतरा वर्षें ते मधुमेहाचा हल्ला चुकविण्यांत यशस्वी झाले होते; पण अखेरीस केवळ दुर्दैवाने त्यांचा मृत्यु घडून आला. १९३७ मध्ये त्यांच्या पायाला भोवरी झाल्याचें निमित्त होऊन त्यांच्या पायावर छोटेसें ऑपरेशन करावें लागलें. ऑपरेशननंतर ड्रेसिंगसाठी ते ससून रुग्णालयात जाऊन राहिले. पण तेथे जखम भरून येण्याऐवजी दुसरें ऑपरेशन करण्याचा प्रसंग आला — आणि हें दुसरें ऑपरेशन प्राणघातक ठरलें. दुसऱ्या ऑपरेशननंतर १० एप्रिल १९३७ रोजीं, रात्रीं १० च्या सुमारास त्यांचें अचानकपणें देहावसान घडून आलें ! त्यांचें देहावसान अशा रीतीने एका सार्वजनिक रुग्णालयांत घडलें ! या इतकी दुःखाची आणि दुर्दैवाची गोष्ट दुसरी कोणती असूं शकेल ?

केतकर १० एप्रिल या दिवशीं इहलोक सोडून गेले; पण ११ एप्रिल उजाडेपर्यंत ती बातमी पुण्यामध्ये कोणाला कळली नव्हती. त्या दिवशीं वर्तमानपत्रें विकणारीं पोरे त्यांच्या मृत्यूची बातमी ओरडूं लागलीं तेव्हा मात्र गावभर ती सर्वांना समजली. मग लष्करांतल्या केतकरांच्या घराकडे आणि ससून रुग्णालयाकडे त्यांचे मित्र, चहाते आणि परिचित धाव घेऊं लागले. संध्याकाळीं केतकरांचें शव महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या कचेरींत आणून ठेवण्यांत आलें आणि अनेकजण त्यांच्या अंत्यदर्शनाचें दुःखद समाधान घेऊन गेले. साहित्यिकांनी भाषणें केलीं, त्यांना गौरवाचे हार वाहिले आणि त्यांच्यावर फुलांचेहि हार घातले. मग मोठी प्रेतयात्रा निघून ती नव्या पेठेजवळच्या स्मशानांत येऊन पोहोचली.

त्या ठिकाणीं केतकरांच्या इच्छेप्रमाणे त्यांच्या शवाला मूठमाती देण्यांत आली ! – आणि त्या वेळीं वेदोक्त मंत्रांचा गंभीर उच्चार करण्यांत आला ! केतकरांचें सर्वच जीवन जसें मुलखावेगळे आणि अलौकिक झालें तसा त्यांचा हा अंत्यसंस्कारहि मुलखावेगळा आणि अलौकिक झाला. ते पूर्वी एकदा आपल्या मित्राच्या दहनाला गेले होते आणि तेथे जळणारें प्रेत पाहून त्यांच्या मनावर विलक्षण परिणाम झाला होता. त्यामुळे आपल्या पत्नीजवळ त्यांनी अशी इच्छा प्रदर्शित करून ठेवली होती, की 'जर माझा मृत्यु तुझ्याआधी झाला तर माझें प्रेत जाळूं नका !' त्यांच्या या इच्छेप्रमाणे त्यांना पुरण्यांत आलें आणि त्यांच्या हिंदु संस्कृतीच्या अभिमानानुसार त्या वेळीं वैदिक मंत्र म्हटले गेले ! सर्व विधि आटोपल्यावर जड अंतःकरणाने लोक घरोघर परतले. केतकरांचा देह मात्र चिरंतन शांतता उपभोगीत भूमातेच्या कुशींत झोपून राहिला.

केतकरांचें आयुष्य अवघें त्रेपन्न वर्षांचें होतें; पण तेवढया काळांत त्यांनी अनेक आयुष्यांचें कार्य करून ठेवलें. तेवीस खंडांचा प्रचंड ज्ञानकोश रचून त्यांनी मराठीच्या इतिहासांत महापराक्रम गाजविला व ज्ञानकोशकार म्हणून आपलें नांव चिरंतन केलें. समाजशास्त्राचा गाढ व विस्तृत व्यासंग जन्मभर करून त्यांनी इंग्रजींत व मराठींत ग्रंथरचना केली आणि थोर समाजशास्त्रज्ञ म्हणून आपली कीर्ति जगाच्या विद्वन्मंडलांत दुमदुमून टाकली. वेदांचा आणि वेदवाङ्मयाचा महासागर घुसळून त्यांनी संशोधनात्मक लेखनाचें अमृत काढलें आणि स्वतःचे पवित्र ग्रंथ स्वतःच न जाणण्याची आपल्या समाजाची लाजिरवाणी स्थिति दूर केली. भूतकाळाच्या अंधकारांत आपल्या प्रतिभेचा दीप पाजळीत शिरून त्यांनीं जगाचा व विशेषतः महाराष्ट्राचा मोठा इतिहास प्रकाशित करण्याचा

यत्न केला आणि भांडारकरांची व राजवाड्यांची उज्ज्वल परंपरा कायम ठेवली. आपल्या व्यासंगाचा संभार घेऊन ते ललित वाङ्मयाच्या कला-भूमीवर उतरले आणि तेथे कादंबरीक्षेत्रांत त्यांनी कांही आगळीच कृति करून दाखविली. त्यांची लेखणी म्हणजे विचारांचे धक्के देणारी वीजच होती. तिने महाराष्ट्राला जेवढे धक्के दिले तेवढे धक्के कोणत्याहि एका लेखणीने पूर्वी कधीहि दिले नसतील. असें विविध व थोर कर्तृत्व मागे ठेवून केतकर गेले. त्रेपन्न वर्षांत त्यांनी हें करून दाखवले. जणू एकाच देहांत ईश्वराने त्यांच्या स्वरूपामध्ये अनेक धडपडणारे आत्मे घातले होते आणि ते सर्व आत्मे त्रेपन्न वर्षें खटपटत होते !

केतकरांनी स्वतःचा संप्रदाय स्थापण्याचा प्रयत्न कधी केला नाही पण आपोआपच त्यांचा संप्रदाय स्थापित झाला आणि ते महाराष्ट्रांतील कोशयुगाचे प्रवर्तक ठरले. त्यांनी उघडलेल्या ज्ञानकोशाच्या आखाड्यांत श्री. य. रा. दाते व चि. ग. कर्वे यांनी शिक्षण घेतलें आणि 'महाराष्ट्र शब्दकोशाचें' कार्य पार पाडले. पुढे त्यांनी 'मराठी वाक्संप्रदाय कोश' काढला, 'शास्त्रीय-परिभाषा-कोश' तयार केला आणि संक्षिप्त ज्ञानकोशाच्या स्वरूपाचा 'सुलभ विश्वकोश' हि पूर्ण केला. 'चरित्र-कोशा' चे कर्ते श्री. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांनीहि कोशकार्याची दीक्षा केतकरांपाशीच घेतली. केतकरांच्या प्रेरणेने प्रथमतः 'महाराष्ट्रीय वाङ्मयसूचि' तयार झाली आणि तिच्याच पावलावर पाऊल ठेवून आता श्री. शं. ग. दाते यांनी आपली उत्कृष्ट 'मराठी-ग्रंथ-सूचि' प्रसिद्ध केली आहे. 'व्यायाम-ज्ञानकोश' व 'व्यावहारिक ज्ञानकोश' यांच्या स्फूर्तीचा उगम केतकरांच्या कर्तृत्वामध्येच सापडण्यासारखा आहे. वाईला सध्या तर्कतीर्थ

लक्ष्मणशास्त्री जोशांच्या नेतृत्वाखाली धर्मकोशाचें काम चाललें आहे; त्याचा संबंध प्रत्यक्षतः केतकरांपर्यंत पोचत नसला तरी ' नवसंहिता ' नामक धर्मवचनांच्या संग्रहाची जी एक कल्पना केतकरांच्या डोक्यांत होती तींत ' धर्मकोश ' बीजरूपाने होता, असें म्हणण्यास हरकत नाही. कोलंबसाने अमेरिकेचा मार्ग शोधल्यावर अनेक धाडसी प्रवासी अमेरिकेच्या वाऱ्या करूं लागले; तसलाच प्रकार मराठी कोशवाङ्मयांत झालेला दिसतो. धाडसाचीं शिडें उभारून केतकरांनी कोशरचनेचा मोठा प्रांत प्रथम हस्तगत केला आणि मागाहून अनेक कोशकारांनी आपापल्या गलबतांतून त्या प्रांताच्या वाऱ्या केल्या. अटलांटिक महासागराच्या शोधकांत जें महत्त्व कोलंबसाचें आहे तेंच महत्त्व ज्ञानसागराच्या महाराष्ट्रीय शोधकांत केतकराचें आहे.

मोठ्या कालव्याच्या कडेला पाण्याचे लहान लहान झिरपे फुटतात त्याप्रमाणे केतकरांच्या कर्तृत्वाच्या कडेला अनेक लहान कार्ये जन्म पावलीं. नापूगरला ' ऑल इंडिया रिपोर्टर ' ही न्यायालयीन निवाडे प्रसिद्ध करणारी विख्यात संस्था आहे. तिचे चालक श्री. वामनराव चितळे हे प्रारंभीं ज्ञानकोशाचे प्रचारक होते आणि त्यांचे सहायक श्री. मुंडले व श्री. दातार हे कांही काल ज्ञानकोशाच्या लेखकवर्गात होते. ' स्वाध्याय 'कर्ते श्रौताचार्य बापटशास्त्री यांनी वेदांचा व यज्ञ-संस्थेचा अभ्यास करण्याची दृष्टि ज्ञानकोशामध्ये केतकरांच्याजवळून उचलली. वेदशास्त्रोत्तेजक सभेस हजारो रुपये मिळवून देणाऱ्या श्री. पराडकरशास्त्र्यांनी सार्वजनिक कामाचा ओनामा ज्ञानकोशमंडळांत गिरवला. ' ऋग्वेदाचें मराठी भाषांतर ' करणारे चित्रावशास्त्री आपली विद्या ज्ञानकोशांतूनच शिकून गेले. हीं ठळक उदाहरणें झालीं; पण

लहान लहान कामांत ज्यांना केतकरांच्यामुळे मार्गदर्शन लाभलें असे कितीतरी लोक असतील. केतकरांच्या कर्तृत्वाचें सार्थक त्यांच्या हातून प्रत्यक्ष पार पडलेल्या ज्ञानकोशासारख्या कार्यांत तर आहेच; पण अप्रत्यक्षतः जीं कामें त्यांच्या कर्तृत्वाच्या कडेला अशीं झिरपलीं त्यांच्यामध्येहि आहे.

समाजाच्या सर्वांगीण प्रगतीचे केतकर भोक्ते होते. त्यामुळे जन्मभर आपल्या लेखणीने, वाणीने व कृतीने त्यांनी समाजाच्या अनेक अंगांना चालना दिली. अंकुरलेलीं कित्येक कामें त्यांनी जोपासलीं तर कित्येक कार्यांचीं कल्पनाबीजें त्यांनी स्वैरपणें इतस्ततः फेकून दिलीं. आज हिंदुस्थान स्वतंत्र झाला आहे, भाषावार प्रांतरचनेच्या कल्पनेला जोर चढला आहे, नागपूर विद्यापीठाने मराठीचा स्वीकार केला आहे, पुणें-विद्यापीठ प्रस्थापित झालें आहे आणि समाजशास्त्राचा अभ्यास महत्त्व पावत आहे. या सर्व घटनांना केतकरांनी आपल्या परीने साहाय्य पोचविलें होतें. आज जीव धरूं लागलेल्या किंवा चौफेर बहरलेल्या आणखीहि अशा कित्येक गोष्टी दाखवितां येतील, की ज्यांच्या वाढीसाठी केतकरांनी वैचारिक किंवा कृतिरूप खटपट केली होती. पण ज्या गोष्टी आज साकार झाल्या आहेत व ज्यांचा पुरस्कार केतकरांनी पूर्वी केला होता तेवढ्यांवरूनच केतकरांच्या द्रष्टेपणाचा किंवा कर्तृत्वाचा अंदाज बांधणें चूक ठरेल. जगाचा एकंदर विकासक्रम ध्यानांत घेऊन सामाजिक प्रगतीच्या अनेक वाटा केतकरांनी आखून ठेवल्या आहेत. त्यांची वाटचाल सुरू होण्यास अजून कांही दशकें तरी लागतील आणि ती वाटचाल संपण्यास शतकांचा अवधि अपुरा पडेल ! तोंवर केतकरांच्या कर्तृत्वाचा प्रवाह चालूच राहाणार, असें म्हटलें पाहिजे.

केतकर गेले पण त्यांच्या कल्पना आणि त्यांचें कर्तृत्व मागे राहिलें आहे. जोंपर्यंत केतकरांच्या ग्रंथांचा अभ्यास होत नाही तोंपर्यंत त्यांच्या कल्पना पुरून ठेवलेल्या द्रव्याप्रमाणे भाकडपणें पडून राहातील. मात्र त्यांच्या ग्रंथांचा अभ्यास झाला तर त्याच कल्पना अनेकांच्या डोक्यांत शिरतील आणि त्यांना खेळत्या भांडवलाचें स्वरूप प्राप्त होईल. त्यांच्यामधून अनेकांना मार्गदर्शन मिळेल, अनेकाना स्फूर्ति मिळेल आणि अनेक नवीं कार्यें उभीं राहातील. म्हणून केतकरांसारख्या विद्वानांचें आणि राष्ट्रोद्धारक पुरुषांचें ऋण फेडण्याचा मार्ग म्हणजे त्यांच्या ग्रंथांचा, त्यांच्या जीवनाचा अभ्यास करणें ! मोठेपणीं केतकरांचा असा अभ्यास करण्याची आकांक्षा सर्व विद्यार्थ्यांनी अवश्य बाळगावी; तरच हें केतकर–चरित्र वाचल्याची खरी फलप्राप्ति त्यांना होईल.

## अभ्यास

१. केतकराचा मृत्यु विशेष दुःखद का ? आणि त्याचा अंत्य संस्कार मुलखावेगळा का ?

२. केतकराना महाराष्ट्रातील कोशयुगाचे प्रवर्तक कां समजतात ?

३. तुम्हाला माहीत असलेल्या कोणत्याहि महाराष्ट्रीय विद्वानाशी केतकराची तुलना करा आणि त्याची योग्यता स्पष्ट करण्याचा प्रयत्न त्या तुलनेंत करा.

४. केतकर–चरित्र वाचल्याची फलप्राप्ति केव्हा होऊं शकेल ?

# परिशिष्ट १.

## महत्त्वाचे कालनिर्देश

डॉ. केतकराच्या चरित्रातील मुख्य घटना कालक्रमानुसार ध्यानात येण्याला पुढील टिपण उपयोगी होईल.

| | |
|---|---|
| जन्म ... ... ... | २ फेब्रुवारी १८८४ |
| मॅट्रिक ... ... ... | १९०० |
| महाराष्ट्र-वाग्विलासाचा प्रारंभ ... | १९०६ |
| अमेरिकेस प्रयाण ... ... .. | १९०६ |
| इंग्लंडमध्ये गमन .. ... ... | १९११ |
| हिंदुस्थानात आगमन ... ... ... | १९१२ |
| ज्ञानकोशास प्रारंभ ... ... ... | १९१५ |
| विवाह ... ... ... | १९२० |
| विद्यासेवकाचा प्रारंभ ... ... ... | १९२४ |
| पुणे-समाचाराचा प्रारंभ ... ... | १९२७ |
| स्वयंनिर्णयी संघाची स्थापना ... ... | १९२७ |
| ज्ञानकोशाची समाप्ति ... ... ... | १९३० |
| भारतमंत्र्यावर फिर्याद ... ... ... | १९३२ |
| म. प्रा. कॉंग्रेसच्या अध्यक्षावर फिर्याद ... | १९३६ |
| अंत ... ... ... | १० एप्रिल १९३७ |

# परिशिष्ट २.

## डॉ. केतकरांचे ग्रंथ

